# पंधरा ऑगस्ट

( संगीत चार अंकी राजकीय नाटक )

लेखक
मधुसुदन कालेलकर

[ सं० उद्यांचे जग, सं० तूं आणि मी, या नाटकाचे कर्ते ]

किंमत १॥ रुपया

नवभारत प्रकाशन-संस्था, गिरगांव, मुंबई ४.

प्रकाशक—
रघुनाथ दिपाजी देसाई,
नवभारत प्रकाशन संस्था,
६, केळेवाडी, मुंबई नं. ४

प्रथमावृत्ति, मार्च १९५०



मुद्रक—
रघुनाथ दिपाजी देसाई,
न्यू भारत प्रिंटिंग प्रेस, ६, केळेवाडी
गिरगांव मुंबई नं. ४



ज्यांच्या पुढारीपणानें आणि अतूल त्यागानें

भारताला स्वातंत्र्य लाभलं व पंधरा

आगस्टचा दिवस उजाडला त्या

पूज्यनीय बापूजींच्या

पवित्र स्मृतिस सादर समर्पण

# मनोगत

" राजकीय विषयावर आणखी एक नाटक! म्हणजे राजकारण एव्हढं स्वस्त झालंय् कीं काय ?" हे उद्गार माझे नाहींत. माझ्या नाटकाबद्दलची नुसती जाहिरात वाचून एका चोखंदळ टीकाकाराचे आहेत हे उद्गार. माझ्या " उद्याचें जग " या राजकीय नाटकाच्या यशामुळें ज्या कांहीं टिकाकाराचा अगर शिष्टांचा जळफळाट झाला, त्यांच्या जळफळाटाचे प्रतीक म्हणजे वरील उद्गार आहेत. मी नुसतं राजकीय नाटक लिहीलं असतं तर त्यांचं कांहीं म्हणणं नव्हतं. पण तें यशस्वी ठरल्यामुळें त्यांना संताप आला आहे. " कुठलीहि पदवी न घेतलेल्या, कुठल्याहि इझमचा छाप न मारून घेतलेल्या अगर काखोटीला जाडजाड राजकारणावरील पुस्तकं घेऊन न फिरण्याऱ्या माणसानं राजकीय नाटक लिहावं म्हणजें काय चेष्टा आहे ! अहो आज हे लोक राजकारणावर नाटक लिहूं लागले, उद्यां अर्थशास्त्रावर नाटक लिहूं लागतील, मग आम्ही एवढे विद्वान येथें कशाला बसलों आहोंत ! " आणि खरंच मलाहि तोच प्रश्न पडला आहे ! कीं एवढे विद्वान लोक बसले आहेत ते कशाला ? देशाच्या अगर समाजाच्या बदलत्या कालखंडावर अजरामर असे शिलालेख कोरायचे सोडून तात्त्विक चर्चेत अगर न कळणाऱ्या लेखमालांत स्वतःच्या ज्ञानाचं सार्थक मानणाऱ्या कूपमंडूक वृत्तीच्या विद्वानापेक्षां सामान्य जनतेला कलेच्या निरनिराळ्या अंगोपांगाद्वारें राष्ट्राच्या अगर समाजाच्या बदलत्या परिस्थितीचें आकलन करून देणारे अविद्वान श्रेष्ठ आहेत. राजकारण ही अत्यंत कठीण गोष्ट आहे. ती फक्त आपलीच मक्तेदारी आहे अशी स्वतःची व इतरांची समजूत करून देऊन या विद्वानांनींच राजकारणापासून सामान्य जनतेला चार हात दूर ठेवलें आहे. लहान मुलाला ज्याप्रमाणे आई बागुलबुवाची भीति दाखवते त्याचप्रयाणे या विद्वानांनी सामान्य–जनतेला राजकारणाची भीति घातलेली आहे. ती भीति दूर व्हावी याच हेतूनें मी " उद्यांचें जग " हें राजकीय नाटक लिहिलें. त्या नाटकाला सर्वसामान्य जनतेचा पाठिंबा मिळाला आणि म्हणूनच हें दुसरे राजकीय नाटक

मी रसिकांच्या सेवेला सादर करीत आहें. "पंधरा ऑगस्ट" हें राजकीय नाटक आहे हें त्याच्या नांवावरूनच कळण्यांत येतें. या नाटकाचं नांव जाहीर झाल्याबरोबर बऱ्याच जणांना या नाटकाबद्दल कुतूहल निर्माण झालें. त्यांचं कुतूहल हें नाटक वाचून अगर पाहून नाहीसं होईल अशी माझी खात्री आहे. आज भारताला ज्या गोष्टींची अत्यंत जरूर आहे, त्यांतली धर्माधर्मीतील ऐक्य ही एक महत्त्वाची गोष्ट आहे. धर्मातीत राज्य निर्माण व्हायला हवं असेल तर धर्माचीं खुळीं बंधनं तोडून फेकून द्यायला हवींत. या बाबत एका मोठ्या कॉंग्रेस पुढाऱ्यानें असे उद्गार काढले होते कीं, "यापुढें भारतांत सर्रास धर्मा-धर्मांत रोटी बेटी व्यवहार सुरू व्हायला हवेत. म्हणजेच पुढली पिढी धर्मांधतेच्या भावनेपासून अलिप्त राहील. त्यांना एकच धर्म सांगतां येईल अन् तो म्हणजे हिंदी!" भारताच्या उद्धाराला या गोष्टीची अत्यंत आवश्यकता आहे. अन् याच तत्वांचा अविष्कार या नाटकांत आढळून येईल. हें तत्व बरेच जणांना पटणार नाहीं! पण म्हणून तें तत्व बरोबर नाहीं हे सिद्ध होऊ शकेल असं मला वाटत नाही. दुसरा एक आक्षेप या नाटकाबद्दल टिकाकार घेतील अन् तो म्हणजे, "नाटकांतील सारीं पात्रें मुसलमान असून तीं मराठी भाषा कशी काय बोलूं शकतात? पण यावर एकच उत्तर आहे आणि तें म्हणजे भाषा ही बहुतांशी धार्मिय पायावर नसून प्रादेशीक पायावर असते. उत्तर हिंदुस्थानांतील हिंदू ज्याप्रमाणें अस्खलीत हिंदी बोलूं शकतात. त्याच-प्रमाणें दक्षिणेंतील स्थायिक मुसलमानहि मराठी बोलूं शकतात. मला वाटतं या नाटकाविषयीं एव्हढा खुलासा पुरे होईल. कारण कितीही खुलासा करू गेलं तरी पटवून न घेणाऱ्या माणसाला तो पटणं शक्य नाहीं. त्यांच्याकरतां हा खुलासा नाहीं.

हें नाटक आज 'कलामिनार' या नाट्यसंस्थेतर्फे रंगभूमीवर येत आहे. त्याबद्दल आभार मानूं गेलं तर कागदच पुरायचा नाहीं. पण प्रामुख्यानें निर्देश करण्यासारख्या व्यक्ती म्हणजे डॉ. वसंत अवसरे, व श्री. एच्. आर. हजारे हे होत! यांच्या मजवरील अकृत्रिम प्रेमामुळेंच हें नाटक रंगभूमिवर येत आहे. ह्या नाटकाबद्दल उपयुक्त सूचना करून ते व्यवस्थित बसवल्याबद्दल श्री. रामचंद्र वर्दे यांचे केव्हढे आभार मानावेत हेंच कळत नाहीं. संगीताची बाजू सांभाळ-ल्याबद्दल श्री. शंकरराव कुळकर्णी यांचे आभार मानणें अप्रस्तुत खास होणार

नाहीं. या नाटकांत मला सहकार्य दिल्याबद्दल नाटकांतील सर्व कलावंताचा मी कायमचा ऋणी आहें. नाटकाच्या इतर बाबतींत सहकार्य केल्याबद्दल श्री. चव्हाण, तातू रेगे, श्री. विजय सेंजीत. कु. ललिता राव यांचे आभार मानलेले त्यांना आवडणार नाहींत तरी माझें तें एक कर्तव्य आहे.

हें नाटक इतक्या उत्कृष्ट रीतीनें छापल्याबद्दल नवभारत प्रकाशन संस्था अभिनंदनास पात्र आहे.

हें नाटक राजकीय आहे पण तें सामान्य माणसाला समजलं असं जर मला आढळून आलं तर माझ्या लिखाणाच सार्थक झालं असं मी समजेन; कारण दहा विद्वान टिकाकारांच्या मतापेक्षां शंभर सामान्य माणसांच्या मतांचीच मला जास्त महति वाटते.

मधुसुदन कालेलकर
वांद्रा
१०।३।५०

टीप—या नाटकांतील "भारत माझा स्वतंत्र झाला" हें गीत सोडून बाकी सर्व गाणीं माझीं आहेत. वरील गाण्याची परवानगी दिल्याबद्दल कोलंबिया कंपनीचे श्री. वसंतराव कामेरकर यांचा मी आभारी आहें.

मधुसुदन कालेलकर

वरील नाटकाचा प्रथम प्रयोग ' कलामिनार ' या नाट्यसंस्थेंतर्फे भारतीय विद्या भवन येथे रविवार ता. १२ मार्च रोजी साजरा होत आहे. या प्रयोगांत कामं करणाऱ्या कलावंताची नांवे—

| | |
|---|---|
| दिलवर : | श्री. विजय सेंजित |
| मुमताज : | कु० लता राव |
| रोषन : | कु० सरोजिनी नाईक |
| अन्वर : | श्री. गजानन भिंगार्डे |
| चचा : | श्री. नानू संझगिरी |
| नझीर : | श्री. भालचंद्र कारखानीस |
| गफूर : | श्री. श्याम गुप्ते |
| जगदीश : | श्री. सुरेश फाळके |

दिग्दर्शक :
श्री. रामचंद्र वर्दे

संगीत :
श्री. शंकरराव कुळकर्णी

व्यवस्थापक : श्री. तातू रेगे, श्री. विठ्ठल चव्हाण

रंगभूषा : श्री. जोगळेकर



# पंधरा ऑगस्ट

## १

[ स्थळ :—मुंबईतील कुलाबा कॉजवे भागांतील एक प्रशस्त ब्लॉक. या ब्लॉकचे मालक मिर्झा ऊर्फ चचा हे साठीच्या घरांतील एक वृद्ध पेन्शनर. दिवाणखान्यांतील मांडणीवरून घरांत राहाणाऱ्या व्यक्तींच्या सुसंस्कृतपणाची कल्पना येते. दिवाणखान्याच्या मागल्या बाजूस मध्यभागीं गॅलरी असून गॅलरीला एक दरवाजा आहे. त्याच्याच उजव्या बाजूला लांबट आकाराची आधुनिक पद्धतिची खिडकी असून त्यावर पडदा सोडलेला आहे. गॅलरीच्या उजव्या बाजूस प्रवेशद्वार असून त्याच्या समोर माडीवर जायला जिना आहे. जिन्यालगतच स्वयंपाक खोलीचा दरवाजा असून त्याच्याच समोर बेडरुम आहे. दिवाणखान्याच्या मध्यभागीं एक मोठा कोच असून त्याच्या कडेला दोन मोठे कोच आहेत. कोचाच्या लगतच राऊंड टेबल असून त्याच्यावर वर्तमान पत्रें विखुरलेलीं आहेत. प्रवेशद्वाराच्या लगत एक ड्रेसींग टेबल आहे. खिडकी-खालीं छोट्या टेबलावर रेडिओ आहे. भिंतीवर महात्मा गांधी, नेहरू, मौ. आझाद यांचे फोटो आहेत.

**काळ** :—१४ ऑगष्ट १९४७ ची रात्र. ११–३० चा सुमार आहे. पडदा वर जातो त्यावेळीं दिवाणखान्यांत कुणीहि नसतं. दिवाणखान्यांत पूर्ण प्रकाश असून, गॅलरीच्या कठड्यावर रोषणाई केलेली आहे. गॅलरींतून घोषणा ऐकूं येत आहेत. "आझाद हिंद जिंदाबाद," "महात्मागांधी जिंदाबाद" वगैरे घोषणा पहिल्यानें जवळून व नंतर लांबून कानीं येतात. गॅलरींत अन्वर–मिर्झा चचांचा मुलगा कसला तरी व्यायाम करीत असतो. अजून पंचवीशींत आहे स्वारी! याला पाहिल्यावर याचं एक वैशिष्ट्य डोळ्यांत भरतं अन् तें म्हणजे हा बुटका आहे. बुटकी माणसें दुष्ट अगर कावेबाज असतात म्हणे. पण त्याला हा अपवाद आहे! हा भोळा आहे. प्रेमळ आहे. पंचविशींत प्रवेश केल्यामुळें त्याला प्रेमाची ओढ लागली आहे. पण बुटक्या माणसावर कुठलीही मुलगी प्रेम करूं शकत नाहीं हा त्याचा न्युनगंड आहे. आपल्या बुटकेपणामुळें आपल्या उत्कर्षाच्या सर्व वाटा खुंटल्या आहेत असं त्याचं प्रामाणिक मत आहे. त्यामुळें स्वारी बरेचवेळां स्वतःवरच बिनसलेली असते. आजही तीच अवस्था आहे. स्वतःच्या बुटकेपणावर तो कधीं नाहीं इतका आज रागावलेला आहे. असं त्याच्या हातवाऱ्यावरून दिसून येतं. तोंच आपसांत कांहींतरी कुजबुजत मुमताज व रोषन प्रवेश करतात. त्यांच्या एकंदर आविर्भावावरून कसला तरी आनंद त्यांना झालेला दिसत आहे. त्यांचं अन्वरच्या व्यायामाकडे लक्ष नसतं. आपल्या पर्सेस ड्रेसींग टेबलावर ठेवून त्या कोचावर अंग टाकून देतात. मुमताज ही मिर्झा चचांच्या धाकट्या भावाची मुलगी. वय वर्षें २२. कॉलेजांत असते. तिनें सलवार व झब्बा घातला असून खांद्यावरून ओढणी घेतली आहे. ही स्वभावानें प्रेमळ व अत्यंत लाघवी आहे. तिच्या डोळ्यावरून ती कुणावरतरी उत्कट प्रेम करीत असावी असा संशय येतो. रोशन ही मिर्झा चचांची पाळलेली मुलगी. लहानपणापासून ही चचांकडेच आहे. ही सुंदर नसली तरी आकर्षक आहे. हिनेही मुमताजप्रमाणें पोषाख केला आहे. ही विशेष शिकलेली नाहीं. पण हजरजबाबीपणांत कुणालाही हार जाणार नाही. हीचा स्वभाव प्रेमळ असला तरीं फटकळ आहे. रुसण्यांत तर हीचा हातखंडा. प्रियकराशीं सदैव भांडत राहणं ही हिच्या प्रेमाची कल्पना. फटकळपणा वजा केला तर ही एक लाख पोरगी आहे. ]

**मुमताज :** [ हुश्श करीत ] दमले बाई.

**रोषन :** आणि मी नाहीं वाटतें दमलें ?

**ताज :** तूं कशी दमशील ?

**रोषन :** [ वेडावीत ] कां ? खुदानें तुझेच पाय फक्त मेणाचे करून माझ्या पायांत हाडां ऐवजीं काय पोलादी खांब घातले आहेत होय ?

**ताज :** तसं नाहीं ग. तूं दमली असशील तरी न दमल्याचा आव आणशील.

**रोषन :** तें कां ग ?

**ताज :** कारण रोषणाई बघण्याच्या निमित्तानें सारी मुंबई पादाक्रांत करण्याची टूम तुझ्याच सुपीक डोक्यांतून निघाली होती.

**रोषन :** जशी कांहीं तुला रोषणाई बघायची नव्हती.

**ताज :** असं कोण म्हणतंय ? आपल्या स्वातंत्र्योत्सवाचा सोहळा न पाहाण्या इतकी मी काहीं अरसिक नाहीं.

**रोषन :** मग काय तर ?

**ताज :** प्रत्येक गोष्टीला सुमार असतो रोषन. आठ वाजतां बाहेर पडलों आपण आणि आतां साडे अकरा झाले.

**रोषन :** पण ताज तूंच सांग इतकी सुंदर रोषणाई पहात असतांना वेळेचं भान राहाणं शक्य तरी आहे का ?

**ताज :** आतां चचा विचारतील तेव्हां येशील भानावर.

**रोषन :** चचा कांहीं मला एकटीलाच नाहीं विचारणार.

**ताज :** मी सरळ सांगेन की याला तूं जबाबदार आहेस म्हणून. मी तुला किती वेळ आठवण केली घरीं चलण्याबद्दल, पण तुझ्या अंगांत स्वातंत्र्य संचारलं होतं ना !

**रोषन :** बरं बरं सांगेन मी चचांना.

**ताज :** काय सांगशील ?

**रोषन :** [ हातांतील घड्याळ्याकडे पहात ] फक्त अर्धा तास बाकी आहे.

**ताज :** [ न समजून ] तो कशाला ?

**रोषन :** एव्हढंहीं कळत नाही नि म्हणे कॉलेजांत जाते.

**ताज :** युनिव्हर्सीटीने तुला परीक्षक नेमलं नाहीं हें नशिबच म्हणायचं.

**रोषन :** हो नाहीतर काय बिशाद होती तुझी मॅट्रीक पास व्हायची.

**ताज** : बरं, बरं. पण त्या अर्ध्या तासाचं काय म्हणत होतीस.

**रोषन** : अग, आणखी अर्ध्या तासाने पंधरा ऑगष्ट उजाडणार, आपण स्वतंत्र होणार. स्वातंत्र्याबरोबर लोकशाही, नी लोकशाहींत मन मानेल तसं भटकण्याला पायबंद घालण्याची कुणाची प्राज्ञा आहे ?

**ताज** : अहो हें व्यासपीठ नाही व्याख्यानाचं. चल आतां माडीवर जाऊन कपडे बदलुंया.

**रोषन** : जशी आज्ञा. [ दोघीही उठतात व जिन्याकडे जायला वळतात तोंच त्याचं लक्ष गॅलरीत उंचीचा व्यायाम करणाऱ्या अन्वरकडे जातं ] हें काय नवीन वेड शिरलंय तुझ्या डोक्यांत अन्वर !

**अन्वर** : [ व्यायामांत खंड पडल्यामुळें चिडून ] हें वेड होय ?

**रोषन** : नाहीतर काय ? हातवारे काय करतोस ! पाय काय नाचवतोस !

**अन्वर** : ज्या गोष्टींत आपल्याला गम्य नाहीं त्या गोष्टींत विनाकारण नाक खुपसूं नये.

**रोषन** : तुझ्या कुठल्या गोष्टींत गम्य असतं ? हे तुझे चाळे मलाच काय खुदाला सुद्धां कळायचे नाहीत.

**अन्वर** : हे चाळे होय ? याला उंचीचा व्यायाम म्हणतात.

**ताज** : उंचीचा व्यायाम ?

**रोषन** : अन् रात्रौ ११-३० वाजतां ? कांहीं काळवेळ. खरोखर अन्वर तुझं डोकं तपासून घ्यायला हवं.

**अन्वर** : [ चिडून ] रोषन ! !

**रोषन** : आणखी कितीही डोळे मोठे केलेस तरी मी मावणार नाही त्यांत.

**ताज** : रोषन गप्प राहा पाहू. कायरे अन्वरभय्या रोषणाई बघायची सोडून तूं हा उंचीचा व्यायाम काय करीत बसलास ?

**अन्वर** : दे आमच्या दुःखावर डागण्या ! अग रोषणाई बघायला सुद्धां उंची लागते. दोन तास गर्दीतून फिरलों; पण पुढें असलेल्या माणसाच्या टोपीशिवाय कांहीं दिसेल तर शपथ. शेवटीं वैतागून इथें आलों—

**रोषन** : आणि हातवारे सुरु केले.

**अन्वर** : आलीस तूं पुन्हां मूळ पदावर. हे हातवारे काय ? ये अशी. [ तीला राऊंड टेबलावरील एक मासीक दाखवितो, ] हें अमेरीकन मासिक हेल्थ

अँड स्ट्रेंग्थ " हीं यामधील उंची वाढवायच्या व्यायामाची चित्रं. झाली खात्री ? कीं तुझ्याप्रमाणेंच अमेरिकन लोक मूर्ख आहेत असं म्हणायचंच तुला. काय धरूं कां कान आतां ?

**रोषन :** मोटा आला कान धरणारा. कायरे तूं काय मला लग्नाची बायको समजलास कान धरायला ?

**अन्वर :** म्हणजे लग्नाच्याच बायकोचा कान धरायचा असतो कीं काय ?

**रोषन :** [ रागाने ] हो बरं कां.

**अन्वर :** मला वाटतं नवऱ्याकडून उपटून न घेण्याकरतांच खुदानें स्त्रियांना कान बहाल केले असावेत.

**रोषन :** आणि कुठलीही गोष्ट अंगाशी आलीं कीं वर हात ठेवण्यासाठींच पुरुषांच्या कानाची योजना झाली असावी.

**अन्वर :** बाकी रोषन; मला तुझ्या भावी नवऱ्याची दया येते. तुझ्याशीं लग्न केल्यापासून चोवीस तासाच्या आंत फकीरी पत्करून तो हिमालयाची वाट तरी धरील नाहीतर कानाचं ऑपरेशन करून घेऊन बहीरा तरी होईल.

**रोषन :** माझ्या लग्नाची काळजी करण्याची तुला गरज नाही. तुझी उंची कशी वाढेल याचीच काळजी घेत जा.

**ताज :** सारखे भांडता कायरे उठल्यासुटल्या. चचांनी तर तुम्हां दोघांची शादी करायची ठरवलंय.

**अन्वर :** यापेक्षां दुसरी शिक्षा अस्तित्वांत नाही कांग ? हिच्याशीं लग्न करून कानाचा लिलांव करण्यापेक्षां राजाबाई टॉवरवरुन खालीं उडी घेतलेली काय वाईट !

**रोषन :** आणि तुझ्याशीं लग्न करून लोकांच्या थट्टेचा विषय होण्यापेक्षां वाघाच्या जबड्यांत मान दिलेली काय वाईट ?

**अन्वर :** अग पण वाघ फक्त माणसालाच खातो.

**रोषन :** [ त्याच्या अंगावर जात ] म्हणजे मी माणूस नाहीं काय ? [ अन्वर आंतल्या खोलींत पळून जातो ] पाहीलंस ताज.

**ताज :** पाहिलं. आणि तूं तरी काय कमी आहेस. ?

**रोषन :** पाण्यापेक्षां रक्त दाट ! शेवटीं चुलतभाऊच जास्त सखीपेक्षां.

**ताज :** रुसलीस ताबडतोब. वेडे तूं मला बहीणीसारखीच नाहींस कां ? चचानी

तूला लहानपणापासून वाढविली असली तरी मी तुझ्यावर पाठच्या बहिणीसारखं—
**रोषन :** कीं भावीसारखं ? थांब तूं. आतां नझीरभय्याला पत्रच लिहीतें.
**ताज :** काय काय लिहीणार ?
**रोषन :** तुझी ताज अगदीं वाईट वाईट आहे. असली भावी मला नको.
**ताज :** अगदी पोरकट आहेस तूं. म्हणूनच आवडतेस मला.

[ अन्वर दारांत येतो. ]

**रोषन :** कां आलास पुन्हा ?
**अन्वर :** नाही नाही, पत्र द्यायला आलों आहे. दुपारींच आलं होतं. तें घ्यावयास विसरलों. [ पत्र टाकून आंत जातो ]
**रोषन :** अगबाई, कुणाचें पत्र ?
**ताज :** माझंच असणार.
**रोषन :** [ पत्र उचलीत ] ठेवलं आहे. माझंच असणार [ पत्र न्याहाळीत ] दिल्लीचं दिसतंय.
**ताज :** देना इकडे.
**रोषन :** दिल्लीहून तुलाच फक्त पत्रं येतात वाटतं ? माझ्या नझीरभय्याने मला पाठविलंय तें पत्र. पाहीलंस ?

[ पत्र दाखविते. ताज झडप घालून पत्र हस्तगत करते. ]

**ताज :** [ पत्ता वाचीत ] माझ्या नांवचं आहे. खोटारडी कुठली ! तुला लिहायला बसलाय तो पत्र !
**रोषन :** नको लिहूं दे जा.
**ताज :** अग, पण हें पत्र तरी ऐकून जा.
**रोषन :** नको, नको, तूंच वाच. [ जाते. ]
**ताज :** [ पत्र छातीशीं धरते व भावना वेगाने गाऊं लागते ]

नाच नाचरे वेड्या मना ॥
येई न क्षण हा पुन्हां पुन्हां ॥
नव्या जगीं तव पाऊल पडले ।
सजवायाचें विश्व चिमुकलें ।

शिरीशिरीं नवी ये कणा कणा
.नयनीं तव नवयौवन हंसले।
गालीं प्रियाचें बिंब उमटलें।
भिरीभिरी निरखिशीं कुणाकुणां ॥
मंदिरांत कुणी असेल बसलं।
तुझ्याविना होउन हिरमुसलं।
जा, कळल्या वरं का खुणाखुणा ॥

[ रोषन जिन्यावर येते ]

[रोषनला पाहून ] पत्र ऐकायचं आहे कां एका माणसाला ?

**रोषन** : मी पत्र ऐकायला नाहीं आलें. गाणं ऐकायला आलें.

**ताज** : मग गाणं ऐकणार ? परत म्हणू ? पण नकोच. पत्रच वाचतें. मला किनई फार आवडलंय तें. पाहिजे तर ऐकू नये एका माणसानं. मी आपलं या कोचाला वाचून दाखवतें. ऐकलंस कारे कोचा, आज कीं नाही दिल्लीहून पत्र आलं आहे मला. एका नकट्या बहिणीच्या भावान लिहीलंय

**रोषन** : मी नकटी आहे वाटतें ? [ धुसफुसत जाऊन कोपऱ्यांतल्या कोचा-वर बसते ]

**ताज** : मला काय विचारतेस ?

**रोषन** : मी तुला कुठें विचारतेय ? मी या आरशाला विचारतेंय.

**ताज** : मग काय म्हणणं आहे त्याचं ?

**रोषन** : तुला काय करायचंय ?

**ताज** : किती सुंदर आहे पत्र. पण एक वेडं माणूस ऐकायला तयार नाहीं. आपल्याला काय त्याचं ? ज्याना ऐकायचं नसेल त्यांनीं कानांत बोटें घालावीं.

**रोषन** : आम्हाला कानांत बोटें घालायला सांगणारी तूं कोण ?

**ताज** : तुझी भावी. कोचा नीट ऐक हो. "प्यारी ताज" आहेच मी प्यारी. "बरेच दिवस मी तुला पत्र न लिहील्यामुळें तूं रागावली असशील. तुझा रागावलेला आरक्त चेहरा मला इकडे सुद्धां दिसत आहे. पण तूं रागावलीस कीं जास्त सुंदर दिसतेस" [ रोषन चमकून पहाते ] तूं नव्हे रे मी. मी इथें

भारताच्या राजधानींत फिरतोंय खरा. पण माझं सारं चित्त तुझ्या मधुर स्मृतीं भोवतीं पिंगा घालीत आहे. हल्लींच मी येथें नौखालीहून आलों, पण तेथें जें कांहीं पाहीलं त्यानं मनांतल्या कोवळ्या आशांचे अंकुर करपून गेले. प्रेतांचे खच् भस्मसात आलेल्या घरांचे अवशेष, होरपळलेल्या अर्धवट मृतांच्या भेसूर किंकाळ्या, यानीं तेथलं सारं वातावरण कसं दुषीत झालं होतं. तिथल्या विनाशाचं जर वर्णन करूं लागलों तर एक कादंबरीच लिहावी लागेल. पण जाऊं दे तें. मी तुला एक आनंदाची बातमी सांगणार आहे. त्याबद्दलचं बक्षीस तूं देशीलच म्हणा. मी लवकरच रजेवर येत आहें. नक्की दिवस सांगत नाहीं. पण महीन्या भरांतच येईन. चचाना सलाम. अन्वरला विचारलंय म्हणून सांग. तुझी मला फार फार आठवण येते. रोषनला—त्या मूर्ख पोरीची मला बिलकुल आठवण होत नाहीं. "

**रोषन** : [ मनावरला ताबा सुटून ] आणखी वाच पदरचं. तो माझा भाऊ आहे म्हटलं.

**नाज** : पण तुझ्यापेक्षां त्याचं प्रेम माझ्यावर आहे म्हटलं.

**रोषन** : अजून शादी झाली नाहीं तुमची म्हटलं.

**ताज** : जनाच्या दृष्टीने नसेल म्हटलं. पण मनाची साक्ष घेतली तर. ही सही पाहिलीस कां ? [ सही दाखवते ] " सर्वस्वी तुझाच नझीर "

**रोषन** : [ ही आतां रडण्याच्या बेतांत आली आहे. ] हो हो समजलं. आतां येऊं दे नझीरभय्याला येथें. तोंडसुद्धां पाहाणार नाहीं मी त्याचं.

**ताज** : बरोबर आहे. अन्वर असताना भावाच्या तोंडाकडे पाहण्याची गरजच काय तुला ?

**रोषन** : मला कुणाच्याच तोंडाकडे पाहायचं नाहीं.

**नाज** : मग आरशांत स्वतःच्याच तोंडाकडे पहात बसणार आहेस वाटतं ?

**रोषन** : [ काय बोलावं हें न सुचल्यामुळें ] आतां गप्प बसतेस कीं चचांना हांक मारूं ? [ जिन्यावर पावलें वाजतात ]

**ताज** : एव्हढी तसदी घेऊं नकोस. ते पहा चचाच खालीं येताहेत.

[ चचा जिन्यावरून खालीं येतात. साठ वर्षें वय आहे यांचं. पण वयाच्या मानानें जास्त वृद्ध वाटतात. चालतांना त्यांची मान थोडी फार हालत असते. त्यांची पांढरी शुभ्र दाढी त्यांच्या छातीवर रुळत असून ती मधून मधून

कुरवळण्याची त्यांना संवय आहे. त्यांचे डोळे करारी दिसत असले, तरी त्याच्या आड त्यांचं बालकाप्रमाणें निष्पाप नी प्रेमळ हृदय दडलेलं आहे. आपल्यासाठीं इतरांनीं त्रास घ्यावा हे त्याना आवडत नाहीं. उलटपक्षीं दुसऱ्यासाठीं कांहींतरी करावं हीच त्यांची मनोमय इच्छा. हे राष्ट्रीय वृत्तीचे मुसलमान असून त्यानी कॉंग्रेसच्या प्रत्येक लढ्यांत हीरीरीने भाग घेतला आहे. व चळवळीला आर्थिक सहाय्य केलं आहे त्यांचा स्वतःचा असा एकच मुलगा अन् तो म्हणजे अन्वर. रोषन नि नझीर ही अनाथ बहीण भावंडें त्यांनीं लहानपणापासून वाढवलेलीं आहेत. आपलं घर लहान मुला-बाळांनीं गजबजलेलं असावं असं त्याना वाटतं. मुलांचं मन दुखू नये म्हणून ते जपत असतात. तारुण्यातच पत्नी वियोग झाल्यामुळं अकालीं गंभीर आणि एकांतप्रीय झालेल्या चचाना मुला-बाळांत मिसळून स्वतःला विसरण्याची संवय लागलेली आहे. मुलं हेंच त्यांचं जीवन सर्वस्व. ]

**चचा** : बेटी रोषन, केव्हां आलांत तुम्ही ?

**रोषन** : अर्धा तास झाला असेल, नाहीग ताज ?

**चचा** : इतक्या रात्रीं बाहेर फिरणं सुरक्षितपणाचं नाही बेटीच्या जातीला.

**रोषन** : पण तुम्ही यायला तयार नाहीं नी अन्वर एकटाच गेला.

**चचा** : मला आतां दगदग सोसत नाही.

**नाज** : पण खरंच चचाजान तुम्ही यायला हवं होतं. काय ती रोषणाई, काय ती गर्दी नी तो उत्साह !

**चचा** : तुम्ही पाहीलंत ना सारं ? माझे दोन डोळे आहांत तुम्ही दोघी. तुमच्या डोळ्यांतून मी सारं कांहीं पाहूं शकतों.

**रोषन** : पण तुम्ही आलां असतां तर तुम्हीं तुमचें बुड्ढपण विसरून गेलां असतां.

**चचा** : बेटी मला यायची खूप इच्छा होती. पण मनाची अनिवार इच्छा शरिराच्या पंगुपणामुळें मनातल्या मनांतच राहिली. मी बसल्याबसल्या पाहात होतों. ती गर्दी नी तो उत्साह. स्वातंत्र्याच्या आनंदांत तुम्ही गर्जना केल्या असाल. " महात्मा गांधी जिंदाबाद " " इनकलाब झिंदाबाद," " वंदे मातरम् " पण बेटी या घोषणा करतांच तुरुंगांत जायाची पाळी यायची, त्यावेळेपासून मी हा स्वातंत्र पाहात आलों आहें. घरां घरांवर फडकणारे तिरंगी ध्वज. तुम्हांला

नुसते तिरंगी दिसले असतील, पण मला त्यांत क्रांतीचा सारा इतिहास दिसला. लोकमान्य टिळकांचा " स्वराज्य हा माझा जन्म सिद्ध हक्क आहे हे वेदवाक्य मला त्यांत दिसलें. दांडी यात्रेला निघालेली महात्माजींची मूर्ती, हंसत हंसत फासांवर चढणाऱ्या भगतसींगाचा चेहरा, व्हिक्टोरिया राणीच्या तोंडला डांबर फांसणाऱ्या चाफेकरांचा बेदरकार हात, कर्नल जॅक्सनला गोळी घालणाऱ्या कान्हेरींची झुंजार मूर्ती, आणि पुष्कळ पुष्कळ मला त्यांत दिसलं. जालीयनवाला बागमध्यें वाहिलेलं रक्त आज सार्थ झालं ! राष्ट्रासाठीं सर्वस्वाचा त्याग करणाऱ्या लाखों सुपुत्रांचा त्याग आज धन्य झाला. आज भारतांतील प्रत्येक नागरीक अभिमानानें म्हणेल कीं, मी आज स्वतंत्र आहे. आझाद आहे. दीडशें वर्षांनंतर माझा लाडका देश स्वतंत्र झाला. बेटी जें स्वप्न खरं करण्यासाठीं लाखों लोकांनीं नळहातावर शीर घेऊन लढा दिला, तें स्वप्न आज खरं झालं.

**ताज** : होय चचा तें स्वप्न खरं झालं. आम्ही त्या अलौकिक वीराना पाहिलं नसेल, पण ज्यांच्यामुळे आजचा दिवस उगवला, त्या हुतात्म्यांच्या स्मृती आमच्या हृदयांत घर धरून राहिल्या आहेत.

**रोषन** : खरंच चचाजान, एव्हढी प्रचंड गर्दी आम्ही कधींही पाहिली नव्हती. जणुं कांहीं माणसांचा सागर पसरला आहे. स्वातंत्र्याच्या नशेनें लोक कसे धुंद झाले आहेत. घरांघरांवर रोषणाई केलेली आहे. आकाशांतल्या तारकांचं तेजसुद्धां या रोषणाईपुढें निस्तेज ठरेल. हिंदु मुसलमान, शिख, पारशी, खिश्चन सारे एक दिलानें फिरताहेत ओरडताहेत.

**चचा** : बेटी स्वातंत्र्याची नशा कांहीं और असते. मी तुमच्या एव्हढा असतों तर हातात तिरंगी झेंडा घेऊन नाचत नाचत बाहेर गेलो असतों. ओरडलों असतों.

**ताज** : अन् खरंच चचा, म्हातारी माणसं सुद्धां या गर्दीत सामी झालीं आहेत. चचाजान आजचा देखावा ज्यानी पाहिला ते धन्य होत.

**रोषन** : [ एकदम घड्याळाकडे पहात ] अगबाई बारा वाजले. आतां पंतप्रधानांचं भाषण चालू असेल सेक्रेटरीएटमध्ये.

**चचा** : केव्हढी तरी गर्दी उसळली असेल नाहीं हें भाषण ऐकायला ?

**ताज** : गर्दी ! सगळी मुंबई लोटली असेल.

**चचा** : आपल्याला उद्यां वर्तमान पत्रांत भाषण वाचून दुधाची तहान ताकावर भागवायला हवी.

**रोषन :** आम्ही थांबणार होतों चचा. पण ही ताज घाई करूं लागली.

**चचा :** तेंच बरं झालं बेटा. नाहींतर या गर्दीत तुमचा तुम्हालाच पत्ता लागला नसता. हं ! १४ ऑगष्टची रात्र संपली. पंधरा ऑगष्टचा दिवस सुरू झाला. बेटी ताज तेव्हढी कॅलेंडरवरील तारीख बदल पाहूं. [ ताज तारीख बदलते. रोषन आंत जाते ] या क्षणाला लाल किल्ल्यावरला युनियन जॅक खालीं उतरून त्या जागीं आपला प्यारा तिरंगी फडकूं लागला असेल. [ रोषन झेंडा घेऊन येते ] आणलास तिरंगा ! लाव तो आपल्या गॅलरींत. [ रोषन झेंडा लावते सर्वजण त्याला प्रणाम करतात. या प्रसंगानं रोषन भारावून जाऊन गाऊं लागते ]

**रोषन :**

भारत माझा स्वतंत्र झाला ।
झर झर झर जा मेघानो
गर्जत गर्जत दाही दिशाना
दिसेल मानव सांगा त्याला
भारत माझा स्वतंत्र झाला
ध्वजा ऊंच जा हिमालयावर
जेथुन दिसतील अवघे सागर
सांग तेथुनी सर्व जगाला
भारत माझा स्वतंत्र झाला

[ गीत संपतां सपता खोलीतून अन्वर बाहेर येतो ]

**चचा :** काय रे तूं आज घरीं कसा ?. स्वातंत्रोत्सवाच्या निमीत्तानें भटकायला मिळण्याची संधी तू सोडावीस.

**रोषन :** हें घरमालकानें पगडी मिळण्याची संधी सोडण्यासारखं आहे.

**अन्वर :** अब्बाजान तुम्ही उगाच आरोप करतां आहांत.

**चचा :** [ हंसत हंसत ] हा आरोप होय ? घरांत कधीं पाय ठरतो कां तुझा ?

**रोषन :** पण चचाजान त्याच्या मागे काय एक काम आहे ! हिंदुस्थानच्या

फाळणीपेक्षां महत्त्वाचा असा स्वतःची उंची कशी वाढेल हा आंतरराष्ट्रीय प्रश्न त्याचा पुढें आहे. [ अन्वर खेरीज सारे हंसतात ]

**अन्वर** : [ रागानें ] रोषन, आतां परत असं कांहीं बोललीस तर हंसताना डोकावणारे दांत घशांत घालीन बघ.

**चचा** : अरे पण असा चिडतोस काय ?

**अन्वर** : चिडूं नको तर काय करूं ? प्रत्येक वेळीं माझी चेष्टा करीत असते ही. असेल माझी उंची कमी. माझी अगदीं परसांतल्या भाजीसारखी अवस्था करून ठेवलीय.

**रोषन** : उपमा चुकली तुझी !

**अन्वर** : उपमा गेली जहान्नममधे.

**चचा** : रोषन अशी काय हात धुवून पाठीला लागतेस त्याच्या ?

**अन्वर** : नाही नाही, आणखी प्रेमळपणानें विचारा.

**चचा** : अरे बेटीची जात.

**अन्वर** : हीला हवी उठतां बसतां लाथ. अब्बा तुम्ही हीचे फार लाड करतां त्याचे परिणाम. त्यामुळेंच ही बेफाम बनलीय.

**चचा** : ऐकलंस बेटी, अन्वरचा काय आरोप आहे तो.

**अन्वर** : हा आरोप नाही. ही वस्तुस्थिती आहे. हिच्यापुढे तुम्हाला स्वतःचा मुलगा सुद्धा परकी वाटूं लागला. माझ्यापेक्षां हिच्यावर प्रेम तुमचं.

**चचा** : अन्वर बेटा. तीला दुसरं कुणी आहे कां माझ्याशिवाय ? हीच्या अब्बानी मरायच्या पूर्वी हीला आणि नझीरला माझ्या पदरांत टाकलं, त्यापासून जीव जडलाय हिच्यावर. अगदीं दोन वर्षांची चिमखडी होती तेव्हांपासून आपल्याकडे आहे. मला बेटीची फार आवड. पण तुझ्या जन्मानंतर तुझी आई अल्ला घरीं रुजू झाली. अन् माझी मुलीची आवड मी हिच्यावरच भागवून घेतली. अन् ही लबाडही कांहीं कमी नाहीं. तुम्ही सारे बाहेर जातां तेव्हां हीच माझ्या जिवाचा विरंगुळा असते. हीला जरासुद्धां दृष्टीआड होऊं देणार नाही मी. म्हणून तर तुझ्याशीं हिची शादी करायची ठरवलीय मी.

**अन्वर** : हा जुलूम आहे. जीव गेला तरी मी हिच्याशी शादी करणार नाहीं.

**रोषन** : अन् माझाही जीव कांहीं वर आलेला नाहीं.

**अन्वर :** हिच्याशीं लग्न करून माझ्या संसाराचा नळबाजार करायची माझी इच्छा नाहीं.

**रोषन :** आणि ह्याच्याशीं लग्न करून दरदिवशीं ह्याची उंची किती वाढली याची नोंद ठेवण्यासाठीं वेधशाळा काढण्याची तयारी नाहीं माझी.

**ताज :** रोषन तुला किती वेळां सांगितलं कीं, पुरुषांच्या तोंडाला तोंड देऊं नये म्हणून. पण तुझी आपली दगडावर रेघ.

**चचा :** जाऊं देग ताज. तूं काय हें यांचं खरं भांडण समजलीस होय ? अग हें आपल्यापुढें नाटक चाललंय. आम्ही ओळखलंय सारं. आम्हीही एके काळीं जवान होतों. ती जवानी, तो इष्क आम्हीही अनुभवलाय.

**ताज :** चचाजान तुम्हीच यांच्यापुढे असं बोलूं लागलांत कीं

**चचा :** कांहीं होणार नाहीं. मोठ्यानीं लहानाशीं मोकळेपणी वागावं. म्हणजे संसारातले बरेचसे संघर्ष टळतात असं मी अनुभवानें सांगू शकतों.

**रोषन :** अगदीं बरोबर आहे तुमचं चचा. ही ताज कीनई आजकाल बुड्ढी सारखी बोलू लागलीय.

**चचा :** [ विषय बदलीत ] बेटी रोषन, नझीरचं काहीं पत्र वगैरे आलं की नाही ?

**रोषन :** मला नी तुम्हांला कशाला येईल पत्र ?. आपल्या लाडक्या ताजलाच पाठवत असेल नझीरभय्या. [ ताज डोळे वटारते ].

**चचा :** हो कां ताज ?. आलंय कां तुला पत्र ?.

**ताज :** [ चांचरत ] आजच आलंय.

**चचा :** त्यांत एव्हढं लाजायचं कशाला ? हाताला मेंदी लागायला वेळ आहे अजून.

**ताज :** हें हो काय चचा. मी नाही जा.

**रोषन :** अन् बरं कां चचा. तें पत्र कीं नाहीं ही मला पण दाखवत नाही.

**अन्वर :** [ इतका वेळ ही स्वारी आपली उंची वाढली कीं नाही हें सप्रयोग पाहात होती. ] तुला कशाला ग दाखवील ती पत्र ? तुझीं प्रेमपत्रे तूं दाखवतेस कां कुणाला ?

**रोषन :** मी लिहितेंच कुणाला ?

**अन्वर :** तूं लिहोशील खूपच. पण उत्तर द्यायला हवं ना कुणी. आतां तो आंधळा आणि बहीरा असेल तर प्रश्न मिटला.

**रोषन :** तुला कशाला चौकशा ? आम्हा बायकांत चोंबडेपणा करायला कुणी सांगितलं तुला ?

**अन्वर :** आतां कशा झोंबल्या मिरच्या नाकाला ?

**चचा :** आलांत तुम्ही मूळपदावर. बेटी नाज नझीर खुशाल आहे ना ? केव्हां यायचं म्हणतोय.

**नाज :** महिन्याभरांत.

**चचा :** [ आनंदानें ] असं ! मला त्याला केव्हां बघीनसं झालंय. किती महिन्यांत मी पाहिला नाहीं त्याला. किती महिने झाले ग त्याला शांतीदलांत सामील होऊन ?

**नाज :** सहा महीने जवळ जवळ. नौखालींत दंगलीचा भडका उडला त्याच-वेळीं तो शांतिदलातर्फे गेला.

**रोषन :** खरंच चचा नझीरभय्या परत आला की पाठवूं नका त्याला. उगीच सुखाचा जीव दुःखांत !

**नाज :** तिकडचीं वर्णनं वाचलीं कीं, कांटा उभा राहातो अंगावर.

**रोषन :** त्या माणसांत त्यानें कसं कार्य केलं कुणास ठाऊक ?

**चचा :** माझा नझीर म्हणजे हिरा आहे हिरा. तो नौखालीला जायला निघाला तेव्हां तो परत यायचा नाहीं हेंच मनाला बजावून मी त्याला निरोप दिला होता. तो जायला निघाला तेव्हां मी आडकाठी केली नाहीं म्हणून तुम्ही माझ्यावर रागावलां होतां.

**रोषन** - होय चचा, मनांतल्या मनांत आम्ही तुम्हाला निष्ठूर पण म्हटलं होतं.

**चचा :** मी त्याला कां पाठवला ? कां पाठवला मी त्याला ? मला काय तो नकोसा झाला होता ? माझ्या पिंडाचा नसला तरी माझा मुलगा आहे तो. माझ्याच जातभाईंनी चालविलेल्या अमानुष अत्याचाराना पायबंद घालण्यासाटीं मी त्याला पाठविला. त्या कार्यांत तो अल्लाकडे गेला असता, तरी मला वाईट वाटलं नसतं. उलट अभिमानानें मी सांगितलं असतं कीं, मुसलमानांकडून होत असलेलं हिंदूंचं नौखालीतील हत्याकांड विझवायला स्वतःच्या रक्ताचं पाणी ज्या

मुसलमानानी शिपडलं त्यात माझा लाडका नझीर होता म्हणून. [ डोळे पुसतो ]

**ताज** : पण चचा हें असं कुठवर चालायचं ? आपण स्वतंत्र झालों आहोंत, पण देशाचे तुकडे करून. आज पाकीस्तानमध्यें विजयाचा जयघोष चालला असतां तेथल्या अल्पसंख्याकांची काय अवस्था झाली आहे.

**चचा** : खरं आहे ताज. ते आनंदाचा उपभोग घेण्याच्या मनःस्थितींत नाहीत. पाकीस्ताननें हे ओळखून त्याना उदार वागणूक द्यायला हवी. त्यांचा विश्वास वाढवायला हवा.

**रोषन** : नी हिंदी संघराज्यांतील मुसलमान ?

**चचा** : हिंदी संघराज्यांतील मुसलमानाना काळजी करण्याचे मुळींच कारण नाहीं. अन् ते आनंदांत आहेत हें तुम्ही आज पाहीलंत. पण हा आनंद खरा-खुरा असायला हवा. इथं राहणाऱ्या प्रत्येकाला हा माझा देश आहे. मी इथं जगलों नी इथेंच मरणार आहें हें पटायला हवं. भारत सरकार आपलं सरकार मानायला हवं त्यानं. नी तिरंगी झेंडा स्वतःच्या जानपेक्षां प्यारा मानायला हवा त्यानं. असं झालं तर सारेजण सुखानें राहूं शकतील.

**रोषन** : पण चचा उद्यां ताजचे अब्बा जर कराचीहून आले—

**चचा** : तर आपण त्यांचं स्वागत करूं. सिंधच्या मंत्री मंडळांत स्थान मिळ-ण्याचा संभव आहे त्याला.

**रोषन** : नसं म्हणायचं नव्हतं मला. तें उद्या येथे आले आणि त्यानी आपणा सर्वांना पाकीस्तानमध्ये नेण्याचं ठरलं तर—

**चचा** : मी जाणार नाहीं माझा देश सोडून. पाकीस्तान कदाचित् सुंदर असेल, समृद्ध असेल, पण तो परका देश आहे.

**ताज** : मी पण जाणार नाहीं चचा.

**चचा** : तुला जावं लागेल बेटी.

**ताज** : नाहीं तरी मी तुम्हांला नकोशीच झालेय.

**चचा** : पगली कुठली. माझी जान मला एकवेळ नकोशी होईल. पण तूं—

**ताज** : मग कशाला पाठवणार मला पाकिस्तानमधें !

**चचा** : मी खुषीनें कां पाठविणार आहे ? पण तू त्याची बेटी आहेस. अब्बानं बोलावलं तर जायला हवं तुला. बेटी आयुष्यांत कांहीं कांहीं वेळां

अशा असतात कीं, कर्तव्य म्हणून कांहीं कटू वाटणाऱ्या गोष्टी कराव्या लागतात.

**ताज :** तें कांही नाही चचा. मी तुमच्या जवळच राहाणार. मला अब्बांची भीति वाटते. कां कुणास ठाऊक ?

**चचा :** अब्बाची भिती ? हंसतील कुणी ऐकलं तर. गफूर जरा करडेपणाने वागतो हे कबूल आहे मला. पण तो अब्बा आहे तुझा. जवळ जवळ तो तीन वर्षांनी येथें येणार आहे. त्याच्या आनंदावर विरजण घालूं नकोस. त्याला कष्टी करूं नकोस. या बुढ्ढ्या चचाची कसम आहे तुला.

**ताज :** [ त्याला बिलगत ] चचा जान.

**चचा :** त्याला दुखवलंस तर फार वाईट वाटेल मला. पगली. डोळ्यांत पाणी तुझ्या ? [ स्वतःच्या डोळ्यांतलं पाणी पुसतो ].

**रोषन :** आपण असं करूं चचा. आपण अब्बाजानना इथेंच ठेवून घेऊं.

**चचा :** [ तिचा गालगुच्च्या घेत. ] बेटी तो इथें कसा राहील ? पाकिस्थान सरकारचा मंत्री आहे तो.

**रोषन :** खरंच चचा ताज गेली तर घर कसं खायला उठेल.

**चचा :** त्याला इलाज नाहीं. दुसऱ्याचं धन आहे हें.

**अन्वर :** ती जणूं आतांच चालली आहे अशाच रीतीनें बोलतां आहां तुम्ही. अजून चचाचं पत्र सुद्धां आलं नाही येण्याबद्दल.

**चचा :** [ हंसत ] काय पागल आहे मी.

**ताज :** तुम्हाला पागल कोण म्हणेल ? चचा तुम्ही फार चांगले आहांत. पुढल्या जन्मी तुमची बेटी म्हणून मला जन्माला घालण्यासाठीं मी अल्लाची प्रार्थना करीत असते.

**चचा :** [ तिला जवळ घेत ] बेटी ताज. [ त्याला पुढें बोलवत नाहीं ]

**ताज :** पण तुम्ही वाईट आहांत. फार फार वाईट आहांत तुम्ही. सर्वांवर फार फार प्रेम करतां, ओढ लावतां. [ इतक्यांत रस्त्यावर कसला तरी गलका होतो. सांपडला, खलास, अरेरे ! वगैरे उद्गारांचा कोलाहाल स्पष्ट ऐकुं येतो. ]

**चचा :** काय झालं रे अन्वर ?

**अन्वर :** [ गॅलरीकडे जातो ] कुणीतरी मोटारखालीं सांपडलंय. सगळेजण भोंवती जमलेत. पण कुणीही कांहीं करीत नाहींं.

**चचा :** तूं बघत काय बसलास. त्याला इथें घेऊन येण्याची व्यवस्था कर. जा जा लवकर. [ अन्वर घाईघाईनें बाहेर जातो ] रोषन बेटी शेजारच्या डॉक्टर भय्याला घेऊन या. [ रोषन बाहेर जाते ] ताज तूं फोन करून ॲम्बूलन्स बोलव बेटी. [ ताज डिरेक्टरी चाळते. व नंबर मिळतांच फोन करूं लागते. चचा अस्वस्थपणें दारांतच उभे रहातात, इतक्यांत अन्वर व इतर दोघे एका अनोळखी जखमी तरुणाला आंत घेऊन येतात. चचा त्यांना आंतल्या खोलीकडे घेऊन जाऊं लागतात. ]

**पडदा**

## २

( **स्थळ** तेंच काळ:–पहिल्या अंकानंतर सुमारें महिन्याभरानंतर. पडदा उघडतो. त्यावेळी रंगभूमीवर कुणीही नसतं. रात्रीचा सुमार. चंद्राचा पिवळसर प्रकाश गॅलरींतून आंत परावर्तित झालेला आहे, आणि त्यामुळें आंतील सजा-वट तेजाळून निघाली आहे. मागील अंकानंतर बरेचसे प्रसंग घडलेले आहेत. मोटारचा अपघात होऊन जो अनोळखी तरुण या घरांत आलेला असतो त्याला नुकतंच हॉस्पीटल मधून घरीं आणण्यांत आलेलं असतं ! तो यावेळपर्यंत बरा झालेला असतो पण त्याची प्रकृति बरी व्हायला डॉक्टरी उपचारापेक्षां मुमता-जची सेवाच जास्त कारणीभूत झालेली आहे. सुखांत दुःखाची गोष्ट एव्हढीच कीं विशिष्ट मज्जातंतूंना अपघातांत मार बसल्यामुळें त्याची स्मृति गेलेली आहे. आपण कोण, कुठून आलो वगैरे तो विसरून गेलेला आहे. मुमताजच्या वडिलांचं अजून पत्र न आल्यामुळें तूर्त तरी ती खुषींत आहे. त्यांतून त्या अनोळखी तरुणाचा सहवास ! रोषनची अन्वरशीं होणारीं भांडणं चालूच आहेत. अजूनहि अन्वर तिच्या प्रेमाला उत्तेजन देत नसल्यामुळें ती हवालदील झाली आहे. अन्वरची तर सध्यां करुणास्पद अवस्था आहे. इतके प्रयत्न करून पाव इंचहि उंची वाढली नसल्यामुळें त्याचा आत्मविश्वास डळमळूं लागला आहे. नझीरची पत्रं आलीं पण त्याचं दर्शन मात्र अद्याप झालेलं नाहीं. चचांत कांहींएक बदल झालेला नाहीं. तीच त्यांची प्रेमळ नी धीरगंभीर वृत्ति.

आज ते अन्वरला नी रोषनला घेऊन सिनेमाला गेले आहेत. ताज घरांतच आहे. कदाचित् त्या अनोळखी तरुणाच्या सोबतीसाठीं राहिली असेल. पडदा उघडल्यानतर क्षणभरानं ताज माडीवरून खाली येते व ज्या खोलींत त्या अनोळखी तरुणाची—तूर्त आपण—त्याला 'अनामिक' म्हणूं—व्यवस्था केली आहे, त्या खोलींत डोकावून पहाते. तो झोंपला आहे याचीं खात्री करून घेऊन मोकळ्या मनानें खोलींत फिरते. चंद्राच्या उत्तेजक चांदण्याने तिच्या चित्तवृत्ती बहरून येतात व त्या भरांत ती गाऊं लागते. )

जरा थांब पारध्या थांब ।
जरा थांब पारध्या नको घेऊं नं वेध जाऊदे मजला ।
मी शपथ घालते तुजला ॥

गांठून ऐकटी मला, वेध घेतला ।
ना इथें आसरा जीव व्याकुळला ।
आधिचा घाव ना बुझे अंतरामधला ॥
मी शपथ घालतें तुजला ॥
विनवितें पदर पसरिते आंसू नयनाला ।
छेडिसी कां वृथा दीन हरिणीला ।

सोडून तीर जाशील दुज्या गांवाला ॥
मी शपथ घालते तुजला ॥
आतूर जरी अंतरी वाटतें परी ।
हा तुझा खेळरे क्षणाचा असला ।
होईल पुरे मज दुःख उभ्याजन्माला ॥
मी शपथ घालतें तुजला ॥

[ हें गीत चालू असताना अनामीक ( तो अनोळखी तरुण ) दारांत येऊन उभा राहातो. तो चांगला उंच असून थोडासा कृश वाटतो. पण त्यामुळें त्याच्या प्रमाणबद्धतेंत भरच पडते. त्यानें एक लांब शर्ट व लेंगा घालला आहे. त्याच्या

अपघाताची खूण अद्याप डोक्यावर दिसत आहे. त्याच्या डोळ्यांत अनोळखी-पणाची झांक मारते आहे. मुमताजच्या गाण्यांत तो पूर्णपणें रंगून गेला आहे. गीत संपल्यावर तो टाळ्या वाजवतो. ]

**मुमताज :** [ दचकून ] अगबाई

**अनामिक :** एव्हढं दचकायला काय झालं ?

**मुमताज :** ही काय रीत झाली. हें थिएटर नव्हे. टाळ्या वाजवायला.

**अनामिक :** [ वरमून ] असं ! माफ करा हं. [ जायला वळतो. ]

**मुमताज :** रागावलांत ? थट्टा सुद्धां कळत नाहीं ?

**अनामिक :** तुमचा राग कुठला नी थट्टा कुठली हेंच कळत नाहीं मला.

**मुमताज :** मग काय काय कळतंय तर ?

**अनामिक :** तुमच्या चेहऱ्याइतकाच तुमचा गळाही गोड आहे.

**मुमताज :** एकूण तुम्हाला माझ्या गळ्याबरोबर चेहऱ्याचीही स्तुती करायची आहे असं दिसतं.

**अनामिक :** वस्तुस्थितिला स्तुती म्हणतां आपण ?

**मुमताज :** ती वस्तुस्थिती असली तरी परिस्थितीचा विचार करायला हवा.

**अनामिक :** सुंदर स्त्रीच्या सौंदर्याची स्तुती करतांना पुरुषाला परिस्थिती विस-रतां येत नाहीं तर.

**मुमताज :** हो बरं ! [ विषय बदलीत ] माझं गाणं आवडलं आपल्याला ?

**अनामिक :** आतां खरं बोललों तर पुन्हा स्तुतीचा आरोप येईल.

**मुमताज :** वा ! बरेच वस्ताद दिसतां आपण.

**अनामिक :** म्हणजे वस्ताद दिसतो मी ?

**मुमताज :** हो. पण तुम्हाला झोप लागली होती ना ?

**अनामिक :** हो ना. पण आपल्या गाण्यामुळें जागा झालों. तुमच्या मधुर गीताचे सुस्वर कानी पडतांच एकादा मंत्र मुग्धा प्रमाणें भारुन जाऊन मी दारां-तच उभा राहिलों. खुष झालों नी टाळ्या वाजविल्या.

**मुमताज :** नी मग ?

**अनामिक :** तीच चुक झाली माझी. टाळ्या वाजवायल्या नको होत्या.

**मुमताज :** कां ?

**अनामिक :** त्यामुळें तुमचं गाणं थांबलं ना. कारण मला वाटत होतं कीं तें गीत कधीहीं संपूं नये. अनंत कालपर्यंत चालू रहावं. त्या सूर सागराच्या प्रवाहांत, चंचल लहरीच्या नावेंत बसून, चंदेरी किरणाचं वल्हं घेऊन पुढं पुढं वहात जावं. पौर्णिमेचा चांद मस्तकावरल्या निळ्या अवकाशांत चमकत राहावा. मलयनिलावरून वहात येणारा मंद मधुर वायू अंगाला बिलगत यावा. अन त्या चंदेरी बरसातींत न्हाऊन निघालेल्या अवनीचं नयन मनोहर रूप नेत्रांत साठवीत राहावं नी शेवटीं—[ थांबतो ]

**मुमताज :** बोला ना पुढें. किती सुंदर बोलतां तुम्ही.

**अनामिक :** आणि शेवटीं...छे छे. कांहीं तरी वेड्यासारखंच बोलत राहिलों नाहीं मी.

**मुमताज :** नाहीं ! उलट तुम्ही बोलत असतांना वाटत होतं कीं, तुम्ही असंच बोलत राहावं. एकाहून एक सुंदर अशा माणकांनी नटलेल्या मालेप्रमाणें ओजस्वी अशा आपल्या तोंडून ओसंडणाऱ्या शब्दपंक्ति जीवाचा कान करून टिपून घ्याव्या नी हृदयांत उमटणारे त्यांचे मृदूल पडसाद ऐकत स्वतःला विसरून जावं. वेडं व्हावं. [ थांबते ]

**अनामिक ;** अहाहा. किती सुंदर बोललांत. थांबलांत कां ? बोला ना पुढे.

**मुमताज :** पुढे पुढे-छे छे. कांहीं तरीच वेड्या सारखं बोलत राहिले मी. [ दोघंही हंसतात. ] बसा ना. [ तो बसतो. ]

**अनामिक :** तुम्हीही बसा ना.

**मुमताज :** कां ? तुमचे पाय दुखायला लागले वाटतं ?

**अनामिक :** बाकी खरंच मला मोठं आश्चर्य वाटतं. मी कोण कुठला. नी तुम्ही माझी एव्हढी आपुलकीनें सेवा कां करावी ?

**मुमताज :** तें तुम्हांला नाहीं कळायचं.

**अनामिक :** कां नाहीं ?

**मुमताज :** तें कळायला स्त्रीचं हृदय असावं लागतं.

**अनामिक :** दिवसांतला असा एकही क्षण जात नाही कीं ज्याक्षणीं मला तुम्ही केलेल्या उपकारांची आठवण होत नाही.

**मुमताज :** हें उपकाराचं ओझं जरा बाजूला टाका आतां.

**अनामिक :** छे छे, असं कसं होईल ? मी कोण ? कुठून कसा आलों. हे मला माहीत नाही. तें आठवण्याचा मी यत्नही करीत नाहीं. पण मी ज्या दिवशीं डोळे उघडले त्यावेळीं पिवळ्या वस्त्रांत गुरफटलेल्या अप्सरेचं दर्शन झालं नी नेत्र सार्थ झाले.

**मुमताज :** कांहींतरींच.

**अनामिक :** अन् त्यावेळीं वाटलं, कीं स्वर्गंगेच्या पांढऱ्या शुभ्र ओघळणाऱ्या स्रोतांत एखादं गुलबकावलीचं फूल तर उमलं नाहीं ना ! वाटलं हा भास तर नाहीं ना.

**मुमताज :** हो भासच होता तो.

**अनामिक :** छे. भास सुद्धां एव्हढे सुंदर नसतात. मी डोळे उघडलेले पाहतांच तुम्ही हसलांत. मिटलेल्या कमलपुष्पांच्या पाकळ्या उलगडल्या.

**मुमताज :** मी जातेच कशी आंत. [ जायला वळते ]

**अनामिक :** मुमताज. माझ्या पंचप्राणाची पखरण जरी तुमच्या वाटेवर पसरली, तरी देखील तुमच्या ऋणांतून मुक्त होणार नाहीं मी.

**मुमताज :** माझ्या ऋणांतून मुक्त व्हायचंय तुम्हाला ?

**अनामिक :** हो. पण तें कसं शक्य आहे.

**मुमताज :** मी सांगतें उपाय.

**अनामिक :** कोणता उपाय ?

**मुमताज :** ही अहोजाहोची भाषा बंद करायची.

**अनामिक :** हा भलताच उपाय.

**मुमताज :** पसंत नाहीं तुम्हाला ?

**अनामिक :** आहे नं. मुमताज मला आणखी किती लाजवायचा विचार आहे तुझा.

**मुमताज :** [ स्वतःशींच ] तुझा. परत म्हणा.

**अनामिक :** ( हंसत ) वेडी कुठली.

**मुमताज :** वेडी. वेडी. हो हो आहेच मी वेडी. पण मला वेड लावणाऱ्या माणसाचं नांव.

**अनामिक :** खरंच काय नांव माणसाचं ?

**मुमताज :** तेंच आज बरेच दिवस विचारीन म्हणतेंय. सांगा नं तुमचं नांव.

**अनामिक :** माझं नांव. माझं नांऽऽव नाहीं आठवत.

**मुमताज :** नाहीं आठवत. मी सांगूं तुमचं नांव ?

**अनामिक :** हं सांग.

**मुमताज :** दिलवर.

**अनामिक :** दिलवर ! दिलवर ! छान आहे, गोड आहे. आवडलं मला हें नांव.

**मुमताज :** आवडलं ? खरंच आवडलं ?

**अनामिक :** हो, पण त्याला एक अट आहे.

**मुमताज :** सांगा नं.

**अना० :** ही अहोजाहोंची भाषा बंद कर पाहूं.

**मुमताज :** कांहीं तरीच.

**अना० :** कांहीं तरीच. मग मला हें नांव मंजूर नाहीं.

**मुमताज :** बरं बाई अट कबूल केली तर.

**अना० :** तर नांव जरूर मंजूर.

**मुमताज :** खरं ?

**अना० :** अगदीं खरं.

**मुमताज :** दिलवर.

**दिलवर :** ताज. [ जवळ जातो ]

**मुमताज :** अगबाई औषधाची वेळ झाली.

**दिलवर :** आतां काय गरज आहे औषधाची ?

**मुमताज :** वारेवा ! अजून पूर्ण कुठें बरा झालायस तूं.

**दिलवर :** खरंच नको औषध. अगदीं कंटाळा आलाय मला औषधाचा.

**मुमताज :** लवकर बरं नाहीं कां व्हायचंय ?

**दिलवर :** हो. पण बरा झालो कीं जावं लागेल ना मला इथून ?

**मुमताज :** मी बरी जाऊ देईन. हें कांहीं धर्मार्थ हॉस्पिटल नाहीं. मोबदला दिल्याशिवाय जायला यायचं नाहीं इथून.

**दिलवर :** मी काय देणार ? जें देण्यासारखं होतं तें केव्हांच देऊन चुकलोय मी तुला.

**मुमताज :** दिल्. ( त्याचा हात हातांत घेते )

**दिलवर :** ताज, अशी काय जादू आहे ग तुझ्या मखमली स्पर्शांत कीं तो होतांच देहाचा कणान्कण कसल्यातरीं मधुर नी अतृप्त आशेसाठीं विरून जातोय असं वाटूं लागतं. मनाची नाजूक बंधने तुटल्याचा भास होतो. नी दृष्टीसमोर एक मनोहर स्वप्न तरळूं लागतं.

**मुमताज :** मी सांगू तें स्वप्न.

**दिलवर :** हं सांग.

**मुमताज :** मोहरलेल्या लताकुंजात आपण बसलों आहोंत, रात-राणीचा मत्त सुगंध आपल्या चित्तवृत्ती सुखवीत आहे. चांद माथ्यावर दाहि कलांनीं तळपतो आहे. सारं वातावरण कसं शांत आहे. माझा एक हात हातांत घेऊन तूं हळूंच मला साद घालीत आहेस.

**दिलवर :** ताज...

**मुमताज :** नो मी तुला बजावतें आहें [ गाऊ लागते ]

**मुमताज :**

> उफाळली रात राया हळू घाली साद ॥
> झोपेंत रंगलेलें सारें खुशाल रान ।
> स्वप्नांत दंगलेरे निःशब्द पान पान ।
> येई चोरपावलानी करूं नको नाद ॥

**दिलवर :**

> सखये भिती कुणाची रानांत मध्यरातीं ।
> करपाश टाक वेगें माझ्या गळ्यांसभोतीं ।
> रंगवुया रात सारी सोबतीस चांद ॥

**मुमताज :**

> तुझिया मिठींत राया स्वर्ग भासलारे ॥
> अन् चुंबनांत तुझिया नव चांद हासला रे ॥
> जाऊदे भूलुन सारे विश्व यौवनांत ॥

दिलवर :

राहिल का गे ही प्रीतीची पौर्णिमा ही प्रीतीची ॥
एकत्र वाट चालूं धुंदींत जीवनाची ॥
राहातील कायमचे कां गुंतवले हात ॥

मुमताज : हीच आणभाक माझ्या विराजे मनांत ॥

दिलवर : } उफाळली रात आतां हळु घाली साद ॥
मुमताज : } हळु घाली साद ॥

दिलवर : काय ग आज सारीं मंडळी गेली कुठें ?

मुमताज : चचाजान अन्वरला नी रोषनला घेवून सिनेमाला गेलेत.

दिलवर : अस्सं. तिकडे थिएटरांत दोघंही भांडत नाही सुटली म्हणजे मिळवली.

मुमताज : हो. मलाही तीच भिती पडलीय.

दिलवर : तूं कां नाहीस गेलीस त्यांच्या बरोबर ?

मुमताज : मी ? विचारायलासुद्धां कांहीं वाटत नाही.

दिलवर : [ हंसतो. खोलींत जायला वळतो तोंच त्याचं लक्ष नेहरूंच्या फोटोकडे जातं ] कुणाचा ग फोटो हा ?

मुमताज : माहीत नाही ? हे आपल्या स्वतंत्र भारताचे पंतप्रधान पंडित जवाहारलाल नेहरु.

दिलवर : जवाहरलाल नेहरु. [ त्याच्या भालप्रदेशावर आठी पडते ] अन् हे कोण ?

मुमताज : महात्मा गांधी. ज्यांच्या सेवेनें, त्यागाने, नी पुढारीपणानें भारत स्वतंत्र झाला, ते भारताचे पितामह महात्मा गांधी.

दिलवर : फार मोठे आहेत कां ग हे. फोटोंतल्या यांच्या चेहऱ्यावरुनसुद्धां अलौकिकत्वाचा भास होतो.

मुमताज : ते अलौकीक आहेत. पण लौकीकाचा हव्यास नाहीं. मोठे आहेत पण मोठेपणाचा बडेजाव नाहीं. जगांत मानवता नांदावी म्हणूनच यांचा अवतार झाला आहे. आणि हा थोर महात्मा आपल्या देशांत जन्माला आला हें केव्हढं आपलं भाग्य ?

**दिलवर** : ताज या महात्म्याला बघायची इच्छा आहे माझी.

**मुमताज** : आपण दोघं एकदां दिल्लीला जाऊं.

**दिलवर** : दिल्ली ! खरंच केव्हां जाऊं या ?

**मुमताज** : जाऊंया हं. पण दिल्ली खूप दूर आहे. आणि आज तर तूं खूप बोलला आहेस. विसावा घे पाहूं आतां खोलींत जाऊन.

**दिलवर** : पण ताज...

**मुमताज** : पण बीण कांहीं नाहीं. ऐकायचं नाहीं माझं.

**दिलवर** : अं, बरं तर जातो मी. [ खोलींत जातो. त्याच सुमारास चचा बाहेरून प्रवेश करतात. त्यांनीं याला ओझरता पाहीला असावा. ]

**चचा** : कोण गेलं ग आतां ?

**मुमताज** : चचा ! आपुले पाहुणे गेले.

**चचा** : असं. मला नझीरचा भास झाला. आजपासून फिरायला सुरवात केली वाटतं ?

**मुमताज** : हो. खूप खूप बोलले ते माझ्या बरोबर. आणि चचाजान मी एक गंमत सांगणार आहे तुम्हाला.

**चचा** : अरे वा. सांग बेटी.

**मुमताज** : तुम्ही हंसणार नाहीं ना ?

**चचा** : नाहीं हंसणार.

**मुमताज** : खरंच नाहीं ?

**चचा** : खरंच नाहीं.

**मुमताज** : मी कीं नाहीं आपल्या पाहुण्यांना नांव ठेवलं.

**चचा** : पण नांव ठेवण्यासारखं आहे काय त्याच्यांत ?

**मुमताज** : हें हो काय चचा ? सदान कदा थट्टा.

**चचा** : बरं बरं सांग पाहूं काय नांव ठेवलंस ?

**मुमताज** : दिलवर.

**चचा** : दिलवर. नांव तर मोठं गोड आहे. पण आवडलं कां त्याला ?

**मुमताज** : हो. पण चचाजान त्याचं खरं नांव काय असावं हो.

**चचा** : मी कसं सांगणार ? अपघातांत त्याची स्मृती गेल्यामुळें त्याला कांहीं

आठवत नाहीं पूर्वीचं. नी अजूनपर्यंत त्याच्या शोधार्थ कुणी आलेलं नाहीं म्हणून तर त्याला हॉस्पीटलमधून इथं आणावं लागलं ना ?

**मुमताज :** चचा, हा हिंदु असावा असं नाहीं वाटत तुम्हाला ?

**चचा :** खात्री आहे माझी. पण आपण हिंदु कीं मुसलमान हें तो पार विसरून गेला आहे. खरंच हिंदुस्थानांतील सर्व लोकांची अशी स्मृति जाईल तर किती बरं होईल. मी कोण आहे. हिंदु की मुसलमान हा प्रत्येकाला प्रश्न पडेल नी शेवटीं कळेल कीं मी हिंदी आहे म्हणून.

**मुमताज :** कित्ती कित्ती बरं होईल असं झालं तर. [ एकदम ] पण चचा अन्वर नी रोषन कुठें आहेत ? तुमच्याबरोबर गेलीं होती ना सिनेमाला. मग तुम्ही एकटेच कसे आलांत ?

**चचा :** ती गम्मत आहे. एव्हढ्यांत नाहीं सांगायची. मग सांगेन. [ हंसत हंसत माडीवर जातात. तोंच अन्वर नी रोषन प्रवेश करतात. दोघंही रागावलेली आहेत. एकमेकांवर नी चचावर. त्यांच्या रागाचं कारण कळेलच आतां ]

**अन्वर :** फुकट गेला इतका वेळ. त्यापेक्षां उंचीचा व्यायाम केला असता तर काहीतरीं फायदा झाला असता.

**रोषन :** मी कांहीं आमंत्रण दिलं नव्हतं तुला सिनेमाचं.

**अन्वर :** आलीस ! तूं बोलावलं असतंस तर मी आलोंच नसतो.

**रोषन :** तुला बोलावणार आणि मी ? उद्यां मुंबईतले सारे पुरुष संपले तर बोरीबंदरवरच्या खड्या पारशाला घेऊन जाईन सिनेमाला.

**अन्वर :** जरूर येईल तो तुझ्याबरोबर. तसंच करत जा यापुढें.

**मुमताज :** अरे पण भांडतां काय असे. कुठला सिनेमा पाहीलांत ?

**रोषन :** कुणास ठाऊक ?

**मुमताज :** म्हणजे सिनेमाकडे लक्ष नव्हतं म्हणायचं तुमचं ?

**अन्वर :** नव्हतंच मुळीं.

**मुमताज :** इतकीं रंगला होतां तुम्ही प्रेमाच्या कानगोष्टी करण्यांत ?

**रोषन :** तुला सांगून ठेवतें ताज. असली थट्टा सहन नाही व्हायची मला.

**मुमताज :** माझी काय कसूर ? तुमच्या बोलण्यावरून तसा अर्थ निघाला.

**रोषन :** मोठी पंडिता कीं नाही अर्थ लावणारी.

**मुमताज :** अग पण असं झालं काय चिडण्याजोगं ?

**रोषन :** पुन्हा साळसुदपणें विचार. चचा कुठें आहेत.

**अन्वर :** कुठें आहेत अब्बा ? मला भयंकर राग आलेला आहे. अब्बा झाले म्हणून वाटेल ती थट्टा करायला हक्क नाहीं त्यांना.

**मुमताज :** कबूल आम्हाला. कसली थट्टा केली त्यानीं ?

**अन्वर :** आज सिनेमाला नेण्याची. अब्बानी बोलावलं म्हणून मी गेलों. ही पण येणार हें ठाऊक असतं तर मी गेलोंच नसतों. कारण तुला ठाऊक आहेच कीं मी फक्त माणसाबरोबर सिनेमाला जातो.

**रोषन :** पुन्हा तूं मला चिडवायला लागलास. मला चचाजाननी बोलावलं होतं.

**मुमताज :** बरं मग ?

**अन्वर :** आम्ही आंत जाऊन बसलों तेव्हां अब्बा मधें बसले होते. म्हटलं ठीक आहे. हरकत नाही. पण ट्रेलर सुरु होताच पान खायला म्हणून जे गेले ते पुन्हां आलेच नाहींत.

**मुमताज :** पण त्यांत एव्हढं चिडायला काय झालं तुम्हाला ?

**अन्वर :** हिचे प्रताप. अब्बा जाण्याची जणूं ही वाटच बघत होती. अब्बा जातांच पडद्यावरील नायिका हिच्या अंगात शिरली नी हिने चक्क माझा हात हातांत घेतला. तरी अंधार होता म्हणून बरं.

**मुमताज :** मग तूं काय केलंस ?

**अन्वर :** असा चिमटा काढला म्हणतेस.

**रोषण :** मोठा पराक्रमच केलास.

**अन्वर :** अन् तुझा पराक्रम. पडद्यावरचा दुःखाचा प्रसंग पाहून हिला रडूं कोसळलं. आणि माझ्या खिशांत हात घालून हिने रुमाल काढला. त्यावेळीं मात्र मी भडकलों नी एकदम ओरडलों. "चोर कुठली." त्याबरोबर सारे लोक आमच्याकडे पाहूं लागले. तेव्हां शहाणपणा सुचून मी बाहेर पडलों. तो तडक इथें आलों. आतां पाहातो तों आहेच मागोमाग. तें कांहीं नाहीं अब्बांना याचा जाब विचारणार आहे. अब्बा आले घरीं ? ( उठतो )

**मुमताज :** होय. आत्तांच आले. वर आहेत.

**अन्वर :** मगर आत्तांच फैसला करून टाकतों. [ तावातावानें माडीवर जातो ]

**मुमताज :** [ रोषनच्या पाठीवरून हात फिरवीत ] धीर धर रोषन. कुणीसं म्हटलं आहे नं—धीर धरी गे धीरा पोटी । फळे रसाळ गोमटी ॥

**रोषन** : आज तर तूं खुषींत दिसतेस. काय झालंय ?

**मुमताज** : कांहींतरींच.

**रोषन** : हं. बहुतेक नझीर भय्याचं पत्र आलेलं दिसतंय.

**मुमताज** : नाही ग.

**रोषन** : मला फसवतेस काय. तुझे डोळेच सांगताहेत. [ माडीवर जाऊं लागते ]

**मुमताज** : अन्वरचा विरह जरासुद्धां सहन होत नाही वाटतं ?

**रोषन** : मी वर चचाकडे जातेंय. [ माडीवर निघून जाते. ]

**दिलवर** : [ खोलींतून प्र. क. ] ताज.

**मुमताज** : कोण दिलवर, झालं. संपला विसावा ?

**दिलवर** : तुझ्याकडे मागायला आलोंय.

**मुमताज** : काय बाई.

**दिलवर** : माझी झोंप.

**मुमताज** : कांहीं तरींच.

**दिलवर** : कां कुणास ठाऊक ? आज झोंपच येत नाही. तुझ्याबरोबर बोललेला शब्द न शब्द कानांत घुमतो आहे. अन् तुझी मनोहर मूर्ती माझ्या डोळ्या-समोर नाचते आहे.

**मुमताज** : ऐकतील ना कुणीतरीं. आलींत सारी जणं घरीं.

**दिलवर** : मी विचार करतोंय असं कां व्हावं ? कसल्यातरीं सुप्त परंतु मधुर आशेचं नृत्य हृदयांत कां सुरूं व्हावं ? प्रीतीच्या पैंजणाचे मनोहर निनाद काना-भोवती कां गुंजारत रहावे. अन कसल्या तरी अमूर्त नी अननुभूत स्वप्नाची यक्षभूमी नेत्रासमोर कां तरळत राहावी ?

**मुमताज** : [ जवळ जात ] दिलवर हें असं कां व्हावं हें मला सुद्धां कळत नाहीं. पण तुझ्या हृदयांतल्या सुप्त आशेच्या नृत्याचं प्रतिबिंब माझ्या नेत्रांत पडल्याचा भास होतो नी प्रीतिच्या पैंजणाचे पडसाद नी ती अमूर्त स्वप्न हृद-आंतल्या कप्प्यांत हेलावत असल्याचा भास होतो. [ याच सुमारास नझीर प्रवेश करतो. यांचे संवाद याने ऐकले तर नसतील ना ! याचं वय पंचवीशींतच आहे. हा दिसायला सुंदर असला तरी आकर्षक नाहीं. हा मध्यम उंचीचा असून संपूर्ण खादीच्या पोशाखांत आहे. या माणसाला कधीं राग येत असेल असं वाटत नाहीं. ताज व दिलवर यांच्या अंगावरून माडीवर जाऊ लागतो. तोंच ताजचं

लक्ष त्याच्याकडे जातं. ] नझीर अन् हें काय मी इथें असताना तूं तडक माडीवर चाललास ?

**नझीर** : चचाना भेटायला चाललों होतों.

**मुमताज** : चचा कांहीं कुठें पळून जात नव्हते.

**नझीर** : आणि तूंही कुठें पळून जाणार होतीस कीं काय ? [ पायऱ्या उतरून खालीं येतो. ] बरं हे—

**मुमताज** : [ चांचरत ] यांचं नांव दिलवर. आपल्याकडे पाहुणे आहेत हे. नी दिलवर हा नझीर. आपल्या रोषनचा भाऊ. [ जिन्याकडे जात हांक मारते] रोषन ए रोषन.

**रोषन** : [ माडी वरून ] काय ग ?

**मुमताज** : खालीं ये जरा. एक गम्मत आणलीय मी.

**रोषन** : [ जिन्यावर येते व नझीरला बघतांच धांवत खालीं येऊन त्याला बिलगते ] भय्या.

**नझूर** : रोषन.

**रोषन** : किती वाळलास रे ?

**मुमताज** : अग पण तूं बोलणार नव्हतीस ना भय्याबरोबर.

**रोषन** : बरीच आहेस कीं ग. तुझ्या एकट्याच्या ताब्यांत देऊं होय याला ? चचा अन्वर खालीं या. नझीर भय्या आलाय. [ अन्वर खालीं येतो. ]

**अन्वर** : हॅलो नझीर. ओल्ड बॉय. अगदीं जवाहरलालसारखा दिसायला लागलास कीं.

**नझीर** : खरंच कीं काय. अरे वा. तुझी प्रकृती कशी काय आहे ?

**अन्वर** : त्याबद्दल आपण सावकाशीनें चर्चा करूं.

**रोषन** : म्हणजे उंची बद्दल म्हणतोस ? [ अन्वर खेरीज सारे हसतात ] [ तोंच चचा माडीवरून खाली येतात. त्यांना खूप आनंद झालेला आहे. आनंदातिशयाने त्यांची काया किंचित कंप पावत आहे. मृत्यूच्या खाईतून नझीर सुखरूप परत आला ही काय कमी आनंदाची गोष्ट आहे ! नझीर त्यांना सामोरा जातो. किंचित् काल दोघेही स्तब्ध राहातात. काय बोलावं हें दोघांनाही सुचत नाहीं. नझीर एकदम खालीं वाकतो नी चचांच्या चरणाना स्पर्श करतो. चचा त्याला

वर उठवतात नी आलिंगन देतात. त्याना आनंदाचा इतका आवेग येतो कीं नझीर अक्षरशः त्यांच्या अश्रूंनी न्हाऊन निघतो. ]

**चचा** : बेटा नझीर खुष आहेस ना ?

**नझीर** : हां चचा बहोत खुष. चचा हिमालयांतून उगम पावलेल्या गंगायमुनाच्या संगमांत स्नान करणारे पवित्र होतात म्हणे ! पण हिमालयापेक्षां मोठं दिल असणाऱ्या आपल्या डोळ्यांतून ओघळणाऱ्या पवित्र गंगायमुनांच्या संगमाखालीं न्हाऊन मी पवित्र झालों. धन्य झालों.

**चचा** : नाही बेटा. उगीच असं बोलून या बुढ्याला शरमिंदा करूं नकोस. बेटा हिमालयाची बरोबरी कशाला मला ? उलट तुझ्यासारख्या महात्माजींच्या सहवासांत राहाणाऱ्या शांति सैनिकाच्या स्पर्शानं पावन झालों मी.

**नझीर** : चचा ! रस्त्यावर पडलेलीं अनाथ मुलं आम्ही. या मातीच्या कणांना तुम्ही उचललंत नी स्वतःच्या प्रेमानं नी अतूल त्यागानं त्याचं सोनं बनवलंत. साध्या दगडांतून संगमरवरी मूर्ति करण्याचा यत्न केलांत तुम्ही. पण मूर्ति कितीही सुंदर असली तरी तिच्याहून हजारोंपट सुंदर नी श्रेष्ठ शिल्पकार असतो. तुम्ही शिल्पकार आहांत चचा. आमच्या मूर्तींत जर कांहीं दिव्यता आली असेल तर ती तुमच्यामुळें.

**चचा** : बोल बेटा थांबलास कां ? तूं बोलूं लागलास कीं, मधाच्या मोहळांतून मध ठिपकल्याचा भास होतो. अगदीं असाच बोलायचा तुझा अब्बा. हीच बोलायची मिठास पद्धत. बोलताना होणारी जिवणीची हीच मधूर हालचाल. नी डोळ्यांतून ओसंडणारं हेंच मार्दव.

**रोषन** : चचाजान, नझीरभय्या प्रवासाहून आलाय. आणि चांगला महिनाभर राहाणार आहे तो. होयनारे भय्या ! सगळंच बोलणं आज संपवूं नका.

**चचा** : पाहीलंस नझीर कशी चिमणीसारखी चिवचीवत असते.

**नझीर** : तुम्हाला अगदीं नकोसं करून टाकीत असेल नाहीं ?

**रोषन** : हो हो. उलट मी असल्यामुळें चचाजानचा वेळ जातो. होय की नाही हो चचा ?

**चचा** : बेटी, तूं ताज नी अन्वर या तीन चिमण्यामुळें तर मला जगावसं वाटतं. तुमची लाडीक चिवचिव ऐकत तर स्वतःचं बुढ्ढपण मी विसरून जाऊं

शकतों. आज नझीर आलाय, दिलवर आहेच. आतां घर कसं गजबजल्या-सारखं वाटणार.

**रोषन** : चचा तुम्ही असं बोलत राहिलांत की भय्या इथंच वेड्यासारखा ऐकत उभा राहाणार. त्याला शुद्धच राहात नाही. चलरे भय्या जरा तोंड वगैरे धुवून कपडे बदल. तोंवर मी तुझ्यासाठीं सुंदर चहा करते.

**नझीर** : अरे वा. आज माझं नशिब उघडलं म्हणायचं.

**रोषन** : अरे अजून तुला तुझ्या बहीणीची किंमत कळलेली नाही. तुझी खोली अशी सुरेख सजवून ठेविलीं म्हणतोस कीं पाहिल्याबरोबर म्हणशील कीं बहीण असावी तर रोषनसारखी.

**अन्वर** : [ इतका वेळ ही स्वारी काय बोलावं ह्याचा विचार करीत होती ] हें पहा रोषन तुझ्या योग्यतेबद्दल प्रश्नच नाही. पण कृपा करून तुझी ही वटवट थांबव. नी आंत जाऊन चहाचं जें कांहीं बरं वाईट करायचं असेल तें कर.

**रोषन** : आज मी खुषींत आहे म्हणून हा मी चोंबडेपणा करतें. चल रे भय्या. अन् हें बघ अन्वर मी चहा करीपर्यंत तुझी उंची किती वाढली हें मोजून ठेव. [ नझीरला घेऊन आंत जाते. जातानां ताजकडे बघून वेडवायला विसरत नाही ]

**चचा** : ताज, दिलवर अरे तुम्ही बोलत कां नाही. बोला खूप बोला. मी खुष आहे. फार खुष आहें.

**दिलवर** : खरंच चचा मी आल्यापासून एव्हढ्या आनंदांत तुम्हाला कधीं पाहिलं नव्हतं.

**चचा** : तुला कळायचं नाहीं. तूं बच्चा आहेस. बापाचं दिल अजून यायचं आहे तुला. बेटा नझीर माझा मुलगा नसला तरी अन्वरपेक्षां जीव आहे माझा त्याच्यावर. त्याला मघाशीं हृदयाशीं धरल्याबरोबर जी विलक्षण कालवाकालव माझ्या काळजांत झाली त्याची कल्पना नाहीं तुला. त्याच्या अब्बाची माझ्या त्याच्या दोस्ताची अल्तमशची आठवण झाली मला. १९३२ च्या सत्याग्रहांत तुरुंगांतच बळी पडला त्याचा. त्याच्या पावलावर पाऊल टाकलंय नझीरनं. तूं नवीन आहेस. माझा नझीर केवढा शूर आहेस. मनाचा केव्हढा दिलदार आहे. हें कळायचं आहे तुला. बेटा दररोज नमाज पढतांना मी अल्लाला शुक्रीया देत असतों असा उमदा बच्चा मला दिल्याबद्दल.

**दिलवर :** खरोखर कुणालाहि अभिमान वाटेल असा तुमचा नझीर आहे.

**अन्वर :** अब्बा, आज तुम्ही फार खुषींत दिसतां तेव्हां एकादं गाणं म्हणून दाखवूं कां ? [ तान घेतो. सारे हंसतात ]

**चचा :** नको, त्यापेक्षां बेटी ताज, तूंच म्हण पाहूं एखादं सुरेल गाणं. असं म्हणशील कीं, मनावर पडलेला खुषीचा ताण तुझ्या गीतलहरीबरोबर मिळून मिसळून जायला हवा.

**मुमताज :** [ गाते ]

आज मला वाटतसे गीत म्हणावे ॥
थयथयुनी आनंदे नृत्य करावे ॥
आभाळीं बघत चांद
पुष्पांचा लुटत गंध
क्षणभर तर जगता या विसरून जावें ॥
प्रीतिचे रश्मीजाल
पांघरुनीया खुशाल
चंदेरी बरसातीं रंगुन जावें ॥

[ गाणं संपतां संपतां नझीर व रोषन प्रवेश करतात ]

**अन्वर :** कायरे प्यालास एव्हढ्यांत तो कडवट चहा ?

**रोषन :** हा सगळा ताजच्या गाण्याचा प्रताप. गाणं ऐकतांच चहा टाकून बाहेर आला.

**चचा :** तशीच गोड गाते ताज.

**रोषन :** नी मी काय वाईट गातें ?

**अन्वर :** वा वा ! तुझा आवाज म्हणजे काय आहे ! तूं गायला लागलीस कीं दहावीस कावळे एकदम ओरडल्याचा भास होतो.

**रोषन :** हें बघ अन्वर तूं उगीच माझ्या वाटेला जाऊं नकोस. मला जर राग आला—

**अन्वर :** तर वाट्टेल तें कर. पण गाऊं नकोस. [ नझीर हंसतो. ] हंसतोस काय नझीर. खरंच सांगतों, आपल्याकडे तो कुक होताना अबदूल म्हणून. अरे

त्यानें एकदांच हिचं गाणं ऐकलं. तत्क्षणीं त्यानें कानाचं ऑपरेशन करून पाकिस्तानची वाट धरली.

**रोषन :** चचाजान, तुम्हीच बघा आतां. हा उगीच छेडतोय मला.

**चचा :** अन्वर तूं आतां लहान कां आहेस असं उठल्या सुटल्या भांडायला ?

**नझीर :** पण चचा रोषनला काय कमी समजतां तुम्ही ?

**रोषन :** कर माझी निंदा. अजून तो चहा पचला पण नसेल. काय भावाची जात कृतघ्न असते ! भय्या, अजून तुला तुझ्या बहिणीच्या प्रेमळपणाची प्रचिती आली नाहीं. येईल येईल, एक दिवस तुला कळून येईल कीं—

**अन्वर :** कीं आपली बहीण किती मूर्ख आहे ती.

**रोषन :** [ रागानें ] अन्वर.

**चचा :** इकडे ये बेटी. अग तूं सगळ्यांत छोटी म्हणून थट्टा करताहेत हे सारे तुझी. हंस पाहूं आतां. [ बाहेरून " तार आहे तार " असा आवाज येतो. नझीर व अन्वर बाहेर जातात व तार घेऊन येतात. ] काय आहेरे ?

**नझीर :** तार आहे. तुमच्या नांवची आहे चचा.

**चचा :** माझ्या नांवची. पाहूं. [ नझीर तार देतो. चचा पाकीट फोडून तार वाचतात. सर्वजण अधीरपणें चचाकडे पहात असतात. चचा हंसतात ]

**नझीर :** कुणाची तार आहे चचा ?

**चचा :** सिंधच्या एका मंत्र्याची.

**मुमताज :** अब्बांची ?

**चचा :** हो गफूरची. उद्यां येतोय तो. [ ताज अस्वस्थ होते. ]

**नझीर :** काय झालं ताज ?

**मुमताज :** कुठें काय. कांहीं नाहीं.

**चचा :** मला माहीत आहे काय झालं तें.

**दिलवर :** खरंच.

**मुमताज :** सांगूं नका कांहीं चचा. उगीच थट्टेला विषय.

**दिलवर :** सांगाच तुम्ही चचा.

**चचा :** हिला भिती पडलीय गफूर हीला घेवून जाईल पाकीस्तानला स्वतः-बरोबर म्हणून ! पगली कुठली. [ तिच्या पाठीवरुन हात फिरवीत ] असं काय

मनाला लावून घेतेस. गफूर तुला घेऊन जायला येतोय कशावरुन ? स्वस्थपणें झोप आतां. विचार करूं नकोस. उशीर झाला. नझीर तूंहीं दमला असशील प्रवासानं. चांगली विश्रांती घे. चल बेटी रोषन. [ चचा व रोषन माडीवर व अन्वर आंतल्या खोलींत जातात ].

**दिलवर :** [ जायला उठतो ]

**मुमताज :** तुलाही झोप आली एव्हढ्यांत ?

**दिलवर :** हो ना. अन् त्यांतून हे बरेच दिवसांनीं आलेयत. तूं बोलत बैस यांच्याशीं.

**मुमताज :** अन् तूं ?

**दिलवर :** यांच्याच खोलींत तळ ठोकलाय मी. तेव्हां आम्ही पुष्कळच बोलूं

[ खोलींत निघून जातो. नझीर अस्वस्थपणें येरझारा घालतो. ]

**नझीर :** ताज

**मुमताज :** अं.

**नझीर :** माझं पत्र मिळालं तुला ?

**मुमताज :** हं.

**नझीर :** आवडलं तुला ?

**मुमताज :** हं.

**नझीर :** अच्छा मी जातों झोपायला.

**मुमताज :** कां रे एकदम कां चाललास ?

**नझीर :** मग काय ? तूं बोलण्याच्या मनस्थितींत नाहींस. प्रत्येक प्रश्नाला आपलं हं ! हं ! हं !

**मुमताज :** नाहीं. अब्बांच्या तारेमुळें मन अस्वस्थ झालंय.

**नझीर :** ताज, मला फसवतेस. आल्या क्षणापासून पहातोंय तूं कसल्यातरी मूढावस्थेंत गुरफटली आहेस. कसलं तरी द्वंद्व तुझ्या मनांत चाललेलं आहे. तुला आनंद झाला आहे पण ज्या तऱ्हेचा आनंद मी अपेक्षिला होता तो आनंद जाऊं दे. मी कांहींतरीच बरळलों नाहीं ? माफ कर मला.

[ एकदम खोलींत निघून जातो. ताज शून्यपणें तो गेलेल्या दिशेकडे पहाते. क्षणभरानें ती जिन्याच्या कठड्याचा आधार घेत घेत हळुहळू वर जाते.

ती जात असतांना दुःखाचे पार्श्वसंगीत सुरू असून त्यांतूनच मध्यरात्र व पहांट यांचें संगीत सुरूं होतें. व दिवस उजाडतो. थोड्या वेळानें रोषन माडीवरून खालीं येते व फर्नीचर हळुहळू कलापूर्ण लावत गाणें म्हणूं लागते. ]

माझिया अंगणीं फुले पारिजात
तुझिया दारांत सडा त्याचा
माझिया बागेंत बहरे केवडा
सुवास तेव्हढा तुझ्यापाशीं
नंदादीप पेटे माझिया घरांत
उजळे भरांत काया तुझी
लागतां चाहूल देह ये फुलोन
आतुरलें मन राया माझें ॥

**अन्वर** : अरेच्या दिवाणखान्यांत भुंगा कुठून शिरला बुवा ?

**रोषन** : भुंगा नव्हे डोमकावळा. म्हणे भुंगा ! कान साफ करुन घे. हा भुंगा नाहीं, मी गाणं म्हणते आहे.

**अन्वर** : अस्सं. अशी गफलत होते. ( स्वतःशींच ) डोमकावळा काय ? पण काय ग, बाकी आज तूं मनावर घेतलेलं दिसतंय. हा साफसफाईचा पीर कुठून शिरला तुझ्या डोक्यांत ?

**रोषन** : आज ताजचे अब्बा येणार आहेत कराचीहून. आठवण तरी आहे कां ? हो. पण तुझ्या कसं लक्षांत असणार ? तुझ्या उंचीपुढें तुला दुसऱ्या गोष्टींची दखल असेल तेव्हां ना ?

**अन्वर** : बरं बरं. आलीस पुन्हां तूं मूळपदावर. उंची ! उंची ! उंची ! पण कायग रोषन, माझी उंची थोडी वाढल्यासारखी नाहीं वाटत तुला ?

**रोषन** : (स्वतः थोडी गिड्डी होऊन) अबब ! खूप वाढलास. चांगला अर्धा फूट तरी वाढेलेला दिसतोस. अरे आंत जाते वेळीं जरा जपून जा हं. वर डोकं आपटेल बिपटेल !

**अन्वर** : ( वेडावून ) बरं बरं !

**रोषन** : अन्वर. एक गोष्ट सांगूं तुला.

**अन्वर** : हूं. सांग.

**रोषन** : ऐकशील माझं ?

**अन्वर** : सांग तर खरं.

**रोषन** : तुझं हें उंची वाढविण्याचं वेड पुरें आतां. उंचीचा आणि कर्तबगारीचा कांहीं संबंध नाहीं. अरे जगांतले बहुतेक कर्तबगार पुरुष बुटकेच असतात. तुझी उंची वाढविण्यापेक्षां अक्कल वाढविण्याचा प्रयत्न कर कांहीं.

**अन्वर** : बरं बरं. मी काय वाढवावं आणि किती वाढवावं हें सांगायला तूं नको मला. वाटेल तिथं नाक खुपसायची संवय लागून गेली आहे.

**रोषन** : सहवासाचा परिणाम दुसरं काय ?

**अन्वर** : आग्रह केला नव्हता मी. पण काय ग रोषन, आज गफूरचचा एकटेच येणार आहेत कीं बरोबर एकादा पाकिस्तानी मिया आणणार आहेत तुझ्यासाठीं ?

**रोषन** : तुला कशाला एव्हढी पंचाईत ?

**अन्वर** : नाहीं; म्हटलं ही साफसफाई पाहून माझा संशय बळावत चालला. गफूरचचा झिंदाबाद. रोषनमिया मुर्दाबाद.

**नझीर** : [ आंतल्या खोलींतून प्र. क. ] कायरे असा जल्लोष करायला काय झालं ?

**रोषन** : तूंच बघ नझीर भय्या. हा म्हणतो कीं गफूरचचा पाकीस्तानांतून एक मिंया आणणार आहेत मला.

**नझीर** : मूर्खच आहे तो. अग, अन्वर असतांना गफूरचचा दुसरा मिंया आणतील कशाला ?

**अन्वर** : हें पहा नझीर आमच्या शादीशिवाय वाटेल तें बोल.

**नझीर** : कायरे अन्वर, काय कमी आहे रे माझ्या बहीणीमध्यें ? इतकी सुंदर, प्रेमळ, लाघवी—अशी मुलगी शोधून तरी सांपडेल कां ?

**अन्वर** : बस्स इतकंच ? बाकीचे गुण विसरलास. अरे हिचं तोंड म्हणजे मुलूख मैदान आहे नुसतीं. तुम्ही कॉंग्रेसवाल्यांनी उगीच एव्हढे लढे दिलेत. रोषनला नुसती चर्चीलच्यापुढें थोडा वेळ उभी केली असतीत, तर त्यानें हात जोडून साष्टांग नमस्कार घालून म्हटलं असतं, कीं बये स्वराज्य घे पण तोंड आवर.

**नझीर** : अरे तोंडाचीच भिती ना. तूं सारखं तोंडाला तोंड देत जा म्हणजे मुलूख मैदान बंद.

**रोषन** : तूंही लागलास कीं वात्रटपणा करायला. शेवटीं जातीला जातच मिळायची.

**नझीर** : अरे अरे रागावलीस ? थांब हां मी अन्वरला असा दम देतों कीं देखते रहो. अन्वर मी तुला बजावून सांगतों कीं रोषनच्या जर तूं पुन्हा वाटेला गेलास तर तुझ्या ताब्यांत रोषनला देऊन टाकीन. लक्षांत ठेव.

[ बाहेर जायला वळतो. ]

**रोषन** : कुठें चाललास रे ?

**नझीर** : विचारूं नये. काम होत नाहीं.

**अन्वर** : अरे थांब मीही आलों. मला हेल्थ अँड स्ट्रेंग्थचा अंक आणायचाय.

[ दोघेहि जातात. रोषन गाणं गुणगुणत आंतल्या खोलींत जाते. थोड्या वेळांत ताज माडीवरुन जड अंतःकरणानें हळुहळू खालीं येते. तोंच आतील खोलींतून दिलवर येतो. ]

**दिलवर** : ताज.

**ताज** : दिलवर.

**दिलवर** : कां बोलत कां नाहींस ?

**ताज** : दिल्, मी जे सांगणार आहे तें ऐकशील ?

**दिलवर** : हो हो ! जरूर.

**ताज** : आज अब्बा येणार आहेत माझे. ते असेपर्यंत तूं माझ्याशीं विशेष बोलूं नकोस अन् बघूंही नकोस. आपल्या प्रीतीचा जराही संशय येता नये त्यांना.

**दिलवर** : बरं बरं. पण लवकर जाणार आहेतना ते परत ?

**ताज** : केव्हां जाणार परत तें मला माहीत नाहीं, पण जातांना कदाचित् मला घेवून जातील कराचीला.

**दिलवर** : आणि मी ?

**ताज** : खरंच काय करशील रे तूं ?

**दिलवर** : तुझा फोटो आहे काग एकादा ?

**ताज** : कां ?

**दिलवर :** तो मी सारखा हृदयाशीं धरून बसेन. तहान नाहीं भूक नाहीं. देहभान विसरून तुझ्या नांवाचा जप सारखा चालला आहे. ही दाढी वाढलेली आहे. ह्या जटा वाढलेल्या आहेत. डोळ्यांतून अश्रूधारा वहात आहेत. अंगाभोंवती भयंकर वारुळ वाढलेलं आहे. आंतून फक्त एकच ध्वनी उमटतो आहे. —ताज—ताज—प्यारी ताज ! अशा स्थितींत भक्त पूर्णपणें कसोटीस उतरल्यावर एक दिवस काड काड आवाज झाला. वारुळ दुभंगलं आणि मी शब्द ऐकलें. "भक्ता वर माग." मी आनंदानें डोळे उघडले. समोर पाहातों तों मूर्तीमंत लावण्यानें नटलेली माझी ताज उभी आहे. मी ताबडतोब ओरडलों. "देवी नको मला वरदहस्त, वरदहस्त नको मला. मला फक्त तूंच हवीस." ( दोघंही हंसतात. ताज कोचावर बसते अन् दिलवर हसण्याच्या भरांत गॅलरींत जातो. नझीर येतो. )

**ताज :** ( दिलवर जवळ आहे ह्या समजुतीनें ) पण अब्बा खरंच येतील कारे आज ?

**नझीर :** मी कसं सांगूं ? येतील कदाचित्.

**ताज :** कोण नझीर ? ( आजुबाजूला पाहते त्याच वेळीं दिलवर रस्त्यावर कुणाला तरी पहाण्याकरितां बाजूला झालेला आहे तो तिला दिसत नाहीं. ) मला वाटलं दिलवर.

**नझीर :** विशेष फरक नाहीं त्यांत. दृष्टीचा बदल आहे तो.

**ताज :** हल्ली सरळ बोलणं विसरलास वाटतं ?

**नझीर :** बोलणं ? मी आल्यापासून बोलतेस तरी कां तूं माझ्याबरोबर ? विसरलीस सारं तूं.

**ताज :** विसरलें नाहीं मी. विसरण्याचा प्रयत्न करतें आहे.

**नझीर :** कुणाला मला ?

**ताज :** अहं. मला स्वतःला.

**नझीर :** उगीच लपंडाव कशाला ? खरं सांग ताज. तूं पूर्वींची ताज राहिली आहेस ? मला खात्री आहे, तूं बदलली आहेस.

**ताज :** असं वाटतं तुला ?

**नझीर :** होय. खात्री झालीय माझी. माझ्याशीं बोलतांना पूर्वीं तुझ्या चेहऱ्या-

वर विलसणारी अनुपम समाधानाची लकाकी आतां कुठें आहे ? नेत्रांतून ओसंडणारा प्रीतीचा अस्फुट भाव आतां कुठें आहे ? माझ्या छातीवर मस्तक ठेवून प्रेमाच्या कानगोष्टी करण्यांत आपण रात्रींच्या रात्रीं—

**ताज** : [ कान झांकून घेत ] नको नको त्या आठवणी !

**नझीर** : आठवणीसुद्धां नकोशा झाल्या तुला. पहा त्या आठवणीसुद्धां कवडी मोलाच्या वाटूं लागल्या तुला. पण ताज त्या आठवणींत माझं सर्वस्व होतं आणि आहे. नौखालीच्या वैराण मुलखांत तळहातावर शीर घेऊन ह्या आठवणीच्या स्मृतीवर मी कोसांचे कोस तुडवले आहेत. त्या भस्मसात भूमींत तुझी आठवण येतांच नंदनवनाची शोभा पाहिली आहे. आणि निर्वासितांच्या करुण कहाण्या ऐकून किटलेल्या कानांत तूं गायलेल्या प्रेमगीतांचे सूर भासमान झाले आहेत. अन् मी नव्या जोमानें कार्याला दाखल झालों आहे.

**ताज** : नझीर. [ दिलवर दरवाजांत येतो. ]

**नझीर** : ताज तुला ती रात्र आठवते ? मी मुंबई सोडायच्या दिवसाची आदली रात्र ! इथें या कोचावर आपण बसलों होतों. तूं रडत होतीस. नी मी तुझी समजूत घालीत होतों. माझा एक हात तूं घट्ट धरून ठेवला होतास. एक क्षणभर सुद्धां तूं मला त्या रात्रीं दृष्टीआड होऊं दिलं नाहींस. माझ्या चेहऱ्याकडे पाहत तूं सारी रात्र जागून काढलीस. पहाट झाली नी मी जायला उठलों, आणि रात्रीपासून दाबून धरलेला भावनावेग खालीं आला. तूं जवळ आलीस, आसूं टिपलेस नी म्हणालीस—माझा नझीर ! मी कधींही सोडणार नाहीं तुला ! आठवतं तुला ?

**ताज** : हो सारं सारं आठवतं मला. माझ्या मनांत यावेळीं काय कालवाकालव चालली आहे ह्याची कल्पना नसेल तुला. माझं तुझ्यावर प्रेम आहे. खूप प्रेम आहे. नी दिलवरहि आहे. दचकूं नकोस. मी त्याच्यावर करायला नको होतं. माझ्या मनाला मी लाख वेळां बजावलं. पण अफसोस. दिलवर, माझ्या आयुष्यांत येईपर्यंत तूं, एकुलता एक तूं होतास माझ्या हृदयांत. नी दिलवर येतांच—

**नझीर** : मी दूर झालों.

**ताज** : तूं दूर झाला नाहींस. दिलवर अगदीं जवळ आला. तुम्हा दोघां पैकीं एका बरोबर मला जीवन घालवायचं आहे. दिलवर अनाथ आहे. कुणीही नाहीं त्याला. त्याच्या सर्वस्वाची मीच स्वामीनी आहे. मी त्याच्यापासून अलग झालें

तर–छेछे तें शक्य नाहीं. तुझंही माझ्यावर प्राणापलीकडे प्रेम आहे. पण त्याहून मोठं असं ध्येय आहे तुला. त्या ध्येयांत तूं मला विसरूं शकशील. तुझी रोषन आहे, चचा आहेत. साऱ्या भारताला शांती देणारा महात्मा ! त्याचा सहकारी तूं ! त्याच्या संगतींत तूं हें दुःख सहज विसरूं शकशील.

**नझीर** : हो. विसरायलाच हवं मला. ताज, नुसत्या प्रेमाच्या चिंतनांतसुद्धां जीवन गुजरण्यांत कांहीं कमी आनंद नसतो.

**दिलवर** : [ गॅलरींतून पुढें येत ] नको नको नझीर मीच जातों.

**नझीर** : दिलवर ! कुठे जाणार तूं ?

**दिलवर** : कुठेंही दूर. तुम्हा देव माणसांपासून दूर. इथं राहयची माझी योग्यता नाहीं. क्षमा कर मला. माझ्यासाठीं मी एव्हढं दिव्य करूं देणार नाहीं तुला.

**नझीर** : मीहीं तुला जाऊं देणार नाहीं. पागल ! ताजचं तुझ्यावर किती प्रेम आहे हें ऐकलंस ना आतांच !

**दिलवर** : होय. पण तुझ्या आशा-आकांक्षांच्या ढांसळलेल्या बुरजावर माझ्या प्रेमाचं मंदीर बांधायचं नाहीं मला. मला आतां कळलं कीं ताजचं तुझ्यावरही प्रेम आहे. मी आलों नसतों तर तसंच राहीलं असतं. कां आलों मी इथं ! तुम्हा दोघांना जन्माचं दुःखी करण्यासाठीं.

**नझीर** : दुःखी ! वेडा आहेस. अरे आपली प्रेमाचीं माणसं सुखांत आहेत हें पाहून कुणाला दुःख होईल ?

**दिलवर** : नाहीं. नझीर, असा त्याग करूं देणार नाहीं मी तुला. मला गेलंच पाहिजे. मी कुणाचा कोण; मला माहीत नाहीं. तुम्हालाही माहीत नाहीं. पण मला इथं तुम्ही ठेवलंत, प्रेमानं वागवलंत. या जन्मीं नाहीं तरीं पुढल्या जन्मीं तुमचा उतराई होण्याचा प्रयत्न करीन. ( जायला निघतो )

**नझीर** : [ त्याला अडवून ] तुला मी जाऊं देणार नाहीं. [ जगदीश प्रवेश करतो. याचा चेहरा दृष्टीस पडतांच हा भयंकर भडकलेला आहे असा कयास येतो. हा नौखालीचा निर्वासित आहे. याचे कपडे–निर्वासिताच्या कपड्याचं वर्णन ते काय करायचं ? हा वयानं तरुण आहे पण परिस्थितीमुळं बराचसा राकट भासतो. ]

**जगदीश** : जाऊं देणार नाहीं म्हणे. नेणार मी त्याला. [ धांवत जाऊन दिलवरला मिठी मारतो ] मोहन, मोहन कुठें होतास तूं इतके दिवस ?

**दिलवर** : [ स्वतःशींच ] मोहन! कोण तूं ?

**जगदीश** : मोहन, एव्हढ्यांत विसरलास तूं मला ? अरे झालं काय तुला ? कीं या लोकांनीं तुला कांहीं करून घातलं ? मोहन, मोहन हे मुसलमान आहेत. आपण हिंदू आहोंत. ज्यांनीं आपल्या आईला, बाबांना, बहीणींना जिवंत जाळलं त्यांच्या जातीचे आहेतरे हे. त्यांचं अन्न खातोस तूं ? अरे या लोकांचा सूड घ्यायचा ठरलं होतं आपलं ! विसरलास एवढ्यांत ?

**दिलवर** : काय बडबडतोस आहेस ? कोण तूं ?

**जगदीश** : कोण ? तुझा धाकटा भाऊ. जगदीश, जगदीश.

**दिलवर** : मी तुला ओळखत नाहीं. चालता हो इथून.

**जगदीश** : चालता हो ! जाणार नाहीं तुला घेतल्याशिवाय. मोहन ! मोहन ! मोहन ! [ चचा माडीवरून खालीं येतात त्याच वेळीं रोषनही खोलींतून येते. ]

**चचा** : काय गडबड आहे ? कोण आहे ?

**जगदीश** : माझं नांव जगदीश. याचा भाऊ आहे मी. १४ ऑगस्टपासून बेपत्ता झालेला हा आज मला तुमच्या गॅलरींत दिसला. घेऊन जाणार मी त्याला.

**चचा** : सबूर सबूर ! बेटा, शांत हो. मी काय सांगतों तें आधीं नीट ऐक—

**जगदीश** : काहीं ऐकायचं नाहीं मला तुम्हा मुसलमानांचं. मला माझा भाऊ पाहिजे, मी त्याला नेणार. आत्तां नेणार.

**चचा** : दिलवर बेटा तूं जरा आंत जा. [ दिलवर आंत जातो ]

**जगदीश** : दिलवर ! म्हणजे नांवसुद्धां बदलंत त्याचं ? बाटवलंत त्याला ? हरामखोरांनो मुसलमान केलांत त्याला ?

**नझीर** : [ एकदम ] खामोष.

**चचा** : नझीर, सबूर बेटा. मी समजूत घालतों त्याची. जगदीश १४ ऑगस्टला रात्री रोषणाईच्या दंगलींत त्याला आमच्या घरासमोर मोटारचा अपघात झाला. आम्ही त्याला हॉस्पिटलमध्यें पोंचवला. त्याच्या जखमा बऱ्या झाल्या. पण पूर्वीची स्मृती मात्र गेली. त्याला पूर्वीचं असं कांहींच आठवेना. म्हणून आम्हीच त्याला इथें आणला. या मुलीनें त्याची जिवापाड सुश्रूषा केली आणि हिनंच

त्याचं नांव दिलवर ठेवलं. आम्ही त्याला बाटवला नाहीं. असा विचार आमच्या स्वप्नांतहि येणार नाहीं. आतां आम्हीं त्याची स्मृती जाग्यावर आणण्याचा प्रयत्न करूं, नी अल्लाच्या कृपेनें ती आली तर एक दिवस मी तुझा भाऊ आनंदानें तुझ्या स्वाधीन करीन.

**जगदीश :** तुमच्या अशा गोड गोड भाषणावर फसणारा मी मुंबईचा हिंदू नाहीं. नौखालीच्या हत्याकांडांतून होरपळून निघालेला मी हिंदू आहे. त्या हत्याकांडांत माझी आई होती, वडील होते, लहान लहान भावंडं होतीं. या साऱ्यांचीं कत्तल मी डोळ्यांनीं पाहिली आहे. ह्याच्या सुडाच्या संधीची वाट पाहातोंय मी इथं.

**चचा :** इथं ? इथल्या निरपराध मुसलमानांची कत्तल करून तुमचं समाधान होईल कां ? नाहीं जगदीश, इथल्या मुसलमानांनी. तुमचा काय अपराध केलाय ? लक्षांत ठेवा. ही धर्मांधतेची लाट कांहीं दिवसांनी ओसरेल नी स्वतःच्या पापाची भुतावळ या धर्मवेड्या लोकांच्या मानेवर बसेल नी त्यांना कळून येईल कीं हिंदू नी मुसलमान एकमेकांचें वैरी नाहींत. आपणा सर्वांचे वैरी हे भांडवलदार आहेत. आपल्या भांडवलाच्या जोरावर जे राजकारण खेळत आहेत. ते भांडवलदार वैरी आहेत. आपणा सर्वांना यांच्याशीं लढायचं आहे. आणि आपला भारत देश—

**जगदीश :** आपला भारत ! भारत तुमचा नाहीं. आमचा आहे. हिंदुचा आहे. तुम्ही मुसलमान आहांत. तुम्ही उपरे आहांत.

**चचा :** म्हणून भारतावर आमचा हक्क नाहीं ? एकाच आईची आपण लेकरं. एका आईला दोन मुलं असलीं नी त्यांतला मोठा मुलगा पहिल्यानं जन्माला येतो, म्हणून त्याचा हक्क राहातो का आईवर ? नाहीं जगदीश, आई सर्वांचीच आहे. जे तिला आई मानतात त्यांची ती आई आहे. आपण भाऊ भाऊ आहोंत. एक भाऊ थोडासा अवखळ नी उद्धट असला तर त्याला सुधारायचा सोडून हांकलून कां द्यायचा ?

**जगदीश :** पुरें झाले तुमचं हें पुराण. मला माझा भाऊ द्या. बोलवा त्याला. कुठें आहे तो ! मोहन मोहन.

**चचा :** ओरडूं नका. विश्वास ठेवा माझ्यावर. अल्लाची कसम खाऊन सांगतों कीं त्याची स्मृती जाग्यावर आल्यावर मी तुमच्या स्वाधीन करीन.

**जगदीश :** तें कांहीं नाहीं. विश्वास नाहीं माझा तुमच्यावर. मी त्याला आत्तांच घेऊन जाणार. मोहन ! मोहन ! !

**नझीर :** आतां जास्त ओरडूं नका. त्याला आणखी त्रास होइल. जा तुम्हीं आतां.

**जगदीश :** जाणार नाहीं.

**नझीर :** तुम्हाला गेलं पाहिजे. [ नझीर त्याला ढकलीत बाहेर नेतो जगदीश ओरडत जातो. ]

**चचा :** [ दमून कोंचावर बसतात. ] या लाहोल अल्ला परवरदिगार ! एकंदर प्रकार असा आहे तर. ताज, रोषन, दिलवरची स्मृती जाग्यावर आणण्यासाठीं आतां आपण प्रयत्न केला पाहिजे. [ नझीर परत येतो ]

**रोषन :** नझीरभय्या, अन्वर कुठें आहे ? चहाला मघाशींच ठेवलंय्.

**नझीर :** त्याचं उंची वाढविण्याचं मासीक त्याला इथं जवळ मिळालं नाहीं म्हणून तो त्याच्या शोधार्थ गेलाय कुठं.

**चचा :** येईल तो. बेटी रोषन चहा घेऊन ये. अन् दिलवरलाही बोलाव (रोषन चहा आणायला आंत जाते. )

**ताज :** चचा, काय होणारहो आतां दिलवरचं ? ( याच वेळीं दिलवर खोलींतून बाहेर येतो. पडद्याच्या आंतून गफूरचा आवाज ऐकूं येतो. " चले जाव यहांसे, पागल कहींका " ) अब्बा आले वाटतं ?

**चचा :** हो, हो गफूरचाच आवाज. (चचा उठतात. इतक्यांत गफूर मागून अन्वर बॅग घेऊन प्रवेश करतात. चचा व गफूर एकमेकांना आलिंगन देतात ) प्रवास चांगला झाला ना ?

**गफूर :** [ हा उणापुरा उंच मुसलमान आहे. हा पाकिस्तान सरकारचा मंत्री आहे. याचा चेहरा अत्यंत रागीट असून त्यावर करारीपणाची झांक मारते. धर्म ही यांची अत्यंत आवडती गोष्ट ! धर्मापुढें पोटच्या पोरीला ठुकरावयाला हा कमी करणार नाहीं. यानें एक सूरवार व काळी शेरवानी घातली असून डोक्यावर जिनाछाप फरकॅप घातलेली आहे. याच्या हातांत एक काठी आहे. ] हो प्रवास चांगला झाला. पण फाटकाशींच एक अपशकून झाला.

**नझीर :** अपशकून ! कसला ?

**गफूर :** कुणीं तरी माथेफिरू फाटकाशीं मुसलमानांना शिव्या देत होता. माझीही चांगला खैर काढून गेला. कोण हिंदु बाळगलाय तुम्ही घरांत ?

**चचा :** सबूर. आधीं माडीवर चल. कपडे बदल सांगतों मी तुला सारं. ताज रोषनला चहा वरच आणायला सांग. चला रे वर. [ चचा व गफूर माडीवर जातांच त्यांच्या मागोमाग अन्वर बॅग घेऊन वर जातो. त्याच्यानंतर नझीर जातो. ताज खोलींत निघून जाते. ]

[ दिलवर एकटाच उरतो दिवाणखान्यांत ! आतांपर्यंतच्या प्रसंगामुळें तो अस्वस्थ झालेला आहे ! इथं रहावं कीं जावं याचा त्याच्या मनांत झगडा चाललेला आहे. एक क्षणभर तो ताज गेलेल्या दिशेकडे पहातो नी एकदम बाहेर निघून जातो. ]

पडदा

# ३

[ **स्थळ**—तेंच. काळ–मागील अंकानंतर सुमारें आठवड्यांतील. वेळ रात्रीची. पडदा वर जातो त्यावेळीं अन्वर तावातावानें येरझाऱ्या घालीत आहे. नझीर बाहेरून प्रवेश करतो. ]

**नझीर** : काय रे काय झालं ?

**अन्वर** : [ थांबून ] काय झालंय. [ त्याच्या अंगावर जातो ]

**नझीर** : अरे अरे पण एव्हढं अस्वस्थ व्हायचं कारण काय ?

**अन्वर** : कारण ? कारणांची यादी आहे.

**नझीर** : अरे वा ! यादी ? [ हंसतो ]

**अन्वर** : तुला सारी थट्टा वाटते.

**नझीर** : पारा बराच चढलेला दिसतोय.

**अन्वर** : आणखी थोडा वेळ असाच राहिला पारा तर डोक्याचा 'थर्मामिटर' पार फुटून जाईल.

**नझीर** : अरे पण झालं तरी काय ?

**अन्वर** : परत तोच प्रश्न ?

**नझीर** : परत तेंच उत्तर.

**अन्वर** : तुला कारण हवंय. ऐक. कारण नं. १ दिलवरचा अजून पत्ता नाहीं. कारण नं. २ ताजनें घेतलेली हाय. कारण नं. ३ अब्बांचं मौन. कारण नं. ४.

**नझीर** : कारण नं. ४ कोणतं रे कारण ?

**अन्वर** : कारण नं. ४ गफूरच्याच बरोबर कराचीला जाण्याची रोषननें केलेली घोषणा.

**नझीर** : हें खरं कारण. पण कायरे अन्वर. रोषण जाणार असली कराचीला ताज बरोबर तर ठीकंच झालं. तुझ्या मागची पीडा तरीं गेली.

**अन्वर** : पण मला करमायचं नाहीं रे.

**नझीर** : पण मी आहें चचा आहेत.

**अन्वर** : पण रोषन छे ! तो कांहीं वेगळाच्च मामला आहे.

**नझीर** : पण तुम्ही तर उठल्यासुटल्या भांडत असतां. तुला तर ती बिलकूल आवडत नाहीं. जाऊं दे ब्याद जाते ती.

**अन्वर** : खरं सांगूं तुला नझीर, रोषन मला आवडते पण तिच्या जिभेच्या पट्टयाची मला भीति वाटते. त्यांतून तिला मी अजीबात आवडत नाहीं.

**नझीर** : मूर्ख आहेस. एकदां प्रयत्न करून पहा. तूं तिला फार फार आवडतोस. पण तिची समजूत आहे कीं तूं तिचा द्वेष करतोस.

**अन्वर** : चांगला न्याय. पण नझीर भय्या, ही मोहब्बत जी चीज आहे ती कशी काय ओळखायची ?

**नझीर** : मी शांतीदलाचा सैनिक आहे. प्रेमदलाचा नाहीं. रागावूं नकोस हें बघ, मला वाटतं तुम्हा दोघांना आतां जें वाटतंय ना तीच मोहब्बत.

**अन्वर** : पण माझ्यासारखा बुटक्या माणसावर रोषन आषक आहे म्हणतोस ?

**नझीर** : आषक व्हायला उंचीच लागते, हा शोध कधीं लागला तुला ? हें पहा रोषन जर करांचीला जावूं नये असें तुला वाटत असेल तर आजच्या आज रोषनला तुझ्या मोहब्बतीची कल्पना आणून दे.

**अन्वर** : अच्छा आत्तांच फैसला करून टाकतों.

**नझीर** : मी कांहीं तरी कारण काढून रोषनला पाठवून देतों बाहेर. मग तूं आणि तुझी मोहब्बत. पण रोषन आहे कुठें ? माडीवर ?

**अन्वर** : उंहूं. त्या खोलींत.

**नझीर** : अच्छा.

**अन्वर** : Thank you नझीर भय्या. पण कायरे तूं गेला होतास कुठें इतका वेळ ?

**नझीर** : निरनिराळ्या निर्वासीत कँपमध्यें गेलों होतों दिलवरची कांहीं माहिती मिळते काय बघायला.

**अन्वर** : कांहीं आशेला जागा.

**नझीर** : उंहूं. तूर्त ह्या आशेचं काय तें पाहा. [ आंत जातो ]

( अन्वर कपडे नीट करतो )

**रोषन** : ( प्र. क. ) अन्वर तूं बोलवलंस मला.

**अन्वर** : हो. बस अशी.

**रोषन** : नको उभीच ठीक आहे.

**अन्वर** : माझी कुठलीही गोष्ट ऐकायची नाहीं असंच ठरवलंस कां तूं ? बस ना.

**रोषन** : ही बसलें. काय काम आहे ?

**अन्वर** : काम म्हटलं तर आहे म्हटलं तर नाहीं. ( ती उठते ) चाललीस ?

**रोषन** : म्हटलं तर चालले म्हटलं तर थांबले.

**अन्वर** : रोषन ए रोषन.

**रोषन** : मला ऐकूं येतंय बोलत जा.

**अन्वर** : तूं माझ्याकडे बघत राहा म्हणजे सांगायला स्फुरण येईल मला.

**रोषन** : काय पीराचं वारं संचारलंय कीं काय तुझ्या अंगांत.

**अन्वर** : माझ्या अंगांत शिरलेला पीर नाहीं परी आहे.

**रोषन** : कुठें आहे ती परी ?

**अन्वर** : बघायचीय तुला ?

**रोषन** : हो दाखव.

**अन्वर** : [ तिला आरशांत तिचेंच प्रतिबिंब दाखवतो ] ती बघ पाहिलीस. छान आहे नाहीं ?

**रोषन** : हो. पण ही परी तुला आवडत नव्हती इतके दिवस.

**अन्वर** : आवडत होती ग. पण माझ्या बुटकेपणामुळं तिचं माझ्यावर प्रेम नसणार असं वाटत होतं मला.

**रोषन** : नी त्या परीलाही वाटत होतं कीं, तिच्या फटकळपणामुळें तूं तिचा तिरस्कार करीत आहेस म्हणून.

**अन्वर** : काय वेडे आहोंत आपण दोघंही. पण काय ग तूं तर कराचीला चाल-लीस मला सोडून.

**रोषन :** हो. मी बरी जाईन तुला सोडून. हा सगळा नझीरभय्याचा बेत.

**अन्वर :** असं काय ? तरींच तो मघाशीं मला म्हणाला कीं, आजच्या आज फैसला करुन टाक म्हणून.

**रोषन :** अन् मलाहि म्हणाला कीं, तुला अन्वर हवा असेल तर कराचीला जाण्याचें जाहीर कर.

**अन्वर :** काय उठाठेवी पाहा तुझ्या भय्याला.

**रोषन :** वारे वा ! त्याच्यामुळें तर--[ लाजते ]

**अन्वर :** बोलना, त्याच्यामुळें तर--

**रोषन :** मी नाहीं जा. तुला सारं कांहीं स्पष्ट सांगावं लागतं.

**अन्वर :** पण रोषन, आतां आपण भांडायचं नाहीं हं.

**रोषन :** अं हं. भांडायचं. पण अगदीं थोडं.

**अन्वर :** थोडं ?

**रोषन :** अगदीं इवलंस. तुझ्याशीं भांडल्याशिवाय चैन नाहीं पडायचं मला.

**अन्वर :** अन् माझ्या उंचीबद्दल हिणवायचं नाहीं.

**रोषन :** नी माझ्या फटकळपणावर तोंड सुख घ्यायचं नाहीं.

**अन्वर :** शक्यच नाहीं. नझीरनेंच सांगितलंय मला तुझ्यावर तोंडसुख घ्यायला. बस्स. आज मी खूष आहें. एकदम एक फूट उंची वाढल्यासारखं वाटतंय मला.

**रोषन :** बस्स एव्हढंच.

**अन्वर :** नाहीं आणखी पुष्कळ वाटतं. वाटतं—

**रोषन :** थांब. सगळं बोलणं एव्हढ्यांत संपवूं नको. माझ्या इवल्याशा कानांत मावायचं नाहीं तें. पण अन्वर, हें चचांना सांगायचं नाहीं बरं कां. त्यांचं त्यांनांच ओळखूं दे.

**अन्वर :** जसा हुकूम बेगम साहेबा.

**रोषन :** आणि अन्वर आजपासून उंचीचे व्यायाम बंद. तुझी उंची वाढली आतां.

**अन्वर :** ती ग कशी ?

**रोषन :** तुझी नी माझी मिळून. [ हंसत हंसत आंतल्या खोलींत जाते. ]

**अन्वर :** बरं बरं. [ हंसत हंसत आपल्या खोलींत जातो. ]

[ क्षणभरानें ताज आपल्या खोलींतून येते. तिच्या कपड्यावरून तिच्या दुःखी मनस्थितीची कल्पना येते. ]

**ताज :** ( अस्वस्थपणें फिरत गाऊं लागते. )

अनामिका जा दूर खुशाल
पाजळीन तव वाटेवरती माझिया प्रीतिची मशाल ॥
जायाचे जर खुशाल जा तर
पहा वळोनी मागें क्षणभर
अडवतील बंधन कोठवर
प्रीतिची वा तुला मृणाल ॥
लागु नये झळ तुला कशाची
पांघरीन मी शाल प्रीतिची
रहा कुठें आबाद परन्तू
जोडून नातीं नवीं खुशाल ॥

( गीत संपतां संपतां ती जिन्याचा आधार घेवून उभी राहाते तोंच माडी-वरून चचा खालीं येतात. )

**चचा :** बेटी ताज.

**ताज :** अं. काय म्हणालांत.

**चचा :** बेटी आज असा काय तुझा चेहरा. तुझ्या चेहऱ्यावरचं चांदणं गेलं कुठें !

**ताज :** माझ्या सुखाचा चांद नसतांना ( जीभ चावते )

**चचा :** बेटी. तुझा चांद तुला परत मिळावा म्हणून वाटेल तें केलं असतं खुदानें त्याला लपवला असता तरी त्याच्याकडून झगडून आणला असता परत. पण तो कुठें आहे कुणास ठाऊक ?

**ताज :** ( एक खोल निश्वास सोडते )

**चचा :** दिलवर परांगदा झाला नी तू अशी कुणाशी बोलत नाहींस, हंसत नाहींस. असं रडवं तोंड करून सदा बसलेली असतेस. तुझं असं वागणं पाहून काळजांत कशी कालवाकालव माझ्या याची तुला कल्पना येणार नाहीं.

**ताज :** मला कल्पना आहे त्याची. पण चचा असं दुःखांत रहावं असं कां मला वाटतं ? पूर्वीसारखं हसावं खेळावं असं नाहीं कां वाटत ? पण मी कम-नशीबी आहे चचा. तुम्ही वाईट वाटून घेवूं नका. हें असंच चालायचं जीवना-पर्यंत. गगनांत क्षणभर उजळून जाणारी वीज अंतर्धान पावते. पण तिची युगायुगानें वाट पहात वृक्षराजी उभी असते.

**चचा :** असें कांहीं तरी बोलूं नकोस. दुःख कुणाला चुकलेलं आहे ? जीवनांत सुखापेक्षां दुःखाचं प्रमाण अधिक असतं म्हणूनच त्याला जीवन म्हणतात. जीवनांत विरह नसता तर प्रणयाची जादू फिकी पडली असती. धीरानें या दुःखाला तोंड दे. इकडे पहा. ऐकशील माझं ? हांस पाहूं.

**ताज :** [ निष्फळ हंसते ]

**चचा :** हंसलीस पण किती भेसूर. थडग्यावर फुललेल्या प्राजक्ताच्या फुलाप्रमाणें वाटलं मला तें हास्य. असं हास्य मला नको आहे. तुझं तें बालपणांतलं हास्य ! अगदीं निर्भर नी निर्व्याज्य होतं तें हास्य. तसं हंस एकदां.

**ताज :** तें बालपणांतलं निर्व्याज्य हास्य आतां कसं येईल ? तें बालपण तसंच कायम राहिलं असतं तर जवानींतील हीं दुःख !

**चचा :** बेटी असं बोलून कां दुःखं कमी होतात. आम्ही सारे दिलवरच्या शोधासाठीं नाहीं कां प्रयत्न करीत ? नझीरकडे पाहा, एव्हढी जबर निराशा झाली असूनसुद्धां दिलवरला शोधण्यासाठीं जीवाचं रान करतो आहे. दिलवर आपणा सर्वांचा प्राण होता. नझीर एव्हढाच त्यानें मला जीव लावला होता. मला कसं अगदीं चुकल्या चुकल्या सारखं वाटतंय.

**ताज :** पण मी गेल्यावर दिलवर येवून काय उपयोग ?

[ गफूरचा आंतून आवाज येतो.—"रोषन, रोषन." ]

**चचा :** गफूर आला वाटतं ?

**गफूर :** ( प्र. क. ) चला सारीं कामं झालीं. उद्यां संध्याकाळच्या विमानानें कराची. ताज तुझीही तयारी झाली असेलच. भय्या तूं पण सर्वांना घेवून ये कराचीला. आमचा पाकिस्तान इतका सुंदर देश आहे म्हणतोस. खाण्या-पिण्याची चंगळ.

**चचा** : असेल कदाचित्. पण माझा भारत काय कमी सुन्दर आहे ? हिमाळ्यानें तट बंदीत केलेला, गंगेनें सुपीक केलेला नी मोठमोठ्या नररत्नानीं भूषवलेला माझा भारत सोडून मी पाकिस्तानांत येणं शक्य तरी आहे कां ?

**गफूर** ; तूं मुसलमान आहेस मिर्झा नी मुसलमानांचा एक देश नी तो म्हणजे पाकिस्तान. [ रोषन दरवाजांत येऊन उभी राहाते ]

**चचा** : धर्मासाठीं देश नसतो. देश म्हणजे निरनिराळ्या धर्मांचं जमातीचं नी संस्कृतीचं आश्रयस्थान. नुसत्या धर्मांच्या नांवावर नी अत्याचाराच्या पायांवर स्थापन झालेलं कुठलंही राष्ट्र चिरस्थाही होत नसतं गफूर.

**गफूर** : झूट. धर्माच्या आत्यंतिक भावनेमुळेंच राष्ट्र निर्मीती होते. नी तीं राष्ट्रं जगांत अग्रगण्य ठरतात.

**चचा** : जरा इतिहास चाळून पाहा. धर्मापेक्षां राष्ट्राला तत्त्वांची अधीक गरज असते. तुला अजून अनुभव यायचा आहे. ज्या देशांत आपण जन्मतों त्या देशाविषयीं किती निरतिशय प्रेम वाटूं लागतं याची तुला कल्पना नाहीं. तें घर तों गांव, तो जिल्हा, नी हें सारं ज्यांत आहे तो देश. त्या देशांत दारिद्य असेल पण तो माझा देश आहे.

**गफूर** : भय्या तुला अजून या हिंदूचे खायचे खालचे दांत दिसून यायचे आहेत. तुला काय वाटतं तुम्हां राष्ट्रीय मुसलमानाना, जी काँग्रेस नाचवतेय ती काय तुम्हांबद्दल प्रेम वाटतं म्हणून ?

**चचा** : मग कशाला ?

**गफूर** : भाई. तेव्हढेच मुसलमान मतदार आपल्या बाजूस वळावे म्हणून. अरे प्रत्येक काँग्रेसवाल्याचं अंतःकरण तपासून पाहिलंस तर त्यांत दडलेल्या हिंदुसभेच्या तत्त्वाचा ठसा तुला दिसून येईल.

**चचा** : नाहीं गफूर. काँग्रेवाल्यांनीं चढवल्यामुळें राष्ट्रीय मुसलमान पुढें आलेले नाहींत. आपल्या कर्तबगारीमुळें पुढें आलेले आहेत.

**गफूर** : कर्तबगारी ! काँग्रेसवाल्यांच्या पुढें पुढें करून मिळवलेल्या मोठेपणाला तूं कर्तबगारी समजतोस. खरे कर्तबगार मुसलमान फक्त पाकिस्तानांत आहेत.

**चचा** : भ्रम आहे तुझा गफूर. फक्त जिनाच्या कतृत्वावरचा एक खांबी तंबू आहे तुमचा. तो खांब कोसळला तर क्षणार्धांत पाकिस्तानचा तंबू खालीं येईल. म्हणे

कर्तबगार पुढारी फक्त पाकिस्तानमधेंच आहेत. जरा नीट डोळे उघडून आमच्या भारताच्या इतिहासाकडे पहा. भारताला भूषणभूत असलेल्या तेजस्वी रत्नगोलांत तुला आपल्यांतले कितीतरी तेजस्वी तारे आढळतील. मौ. अझाद, गफारखान, बॅ. असफअल्ली, युसूफ मेहरअल्ली, शेख अबदुल्ला. कोण आहेत हे ? यांच्या त्यागाच्या पासंगला पुरणारा एक तरी पुढारी तुमच्यांत आहे कां ? त्यागाची नी कर्तृत्वाची मानवस्त्रें ल्याल्याशिवाय भारतांत कुणीही पुढारी होऊं शकत नाहीं.

**गफूर :** करायचं आहे काय या लोकांच कर्तृत्व ? वैऱ्याच्या उत्कर्षासाठीं राबणारे पाकिस्तानचे हे मारेकरी.

**चचा :** मारेकरी. खरे मारेकरी तुम्ही आहांत. तुम्ही लीगवाले मुसलमान आहांत. तुम्ही आपल्या मातेच्या छातींत फाळणीची कट्यार खुपसलीत नी या सुंदर देशाचे दोन तुकडे केलेत.

**गफूर :** आम्ही तुकडे केले नाहींत. आपल्या हक्काचा वांटा मागून घेतला.

**चचा :** वांटे करायला राष्ट्र म्हणजे काय तुम्ही वडिलोपार्जित इस्टेट समजलांत, कीं वतनवाडी समजलांत ? देश सर्वांचा असतो. म्हणून त्याला मातृभूमी म्हणतात. आईचे वाटे कां कुणी करत असतं ? केव्हढी पवित्र भावना माझा देश या शब्दाभोंवतीं गुंफलेली असते. कुणी निर्माण केला हा देश ठाऊक आहे तुला ? कॉंग्रेसनं नाहीं, लीगनं नाहीं, हिंदुसभेनं नाहीं, प्रत्येक देश हा तिथ राहाणाऱ्या, तिच्यासाठीं कसणाऱ्या, श्रमणाऱ्या, नी त्याच्यासाठीं सर्वस्वाची कुर्बानी करणाऱ्यांच्या घामांतून नी रक्तांतून निर्माण होत असतो. तो कायमचा दुभंग करणं कुणालाही शक्य नसतं, नी शक्य नाहीं. तुला काय वाटतं आमच्यापासून अलग होऊन पाकिस्तानांतले मुसलमान सुखी होतील ? शक्य नाहीं. तुमच्यांतल्या स्वार्थसाधु लोकांनीं भरवलेलं हें वेड एक दिवस आपोआप दूर होईल नी दूर झालेला पाकिस्तान हिंदुस्थानला परत सांधला जाईल. हें आमचं राष्ट्रीय मुसलमानांचं स्वप्न साकार होईपर्यंत खुदानें मला जिंदगी द्यावी.

**गफूर :** तुमचं हें मत किती दिवस टिकतंय हेंच पाहायचंय मला.

**चचा :** घटके घटकेला मतं बदलायला आम्ही लीगी मुसलमान थोडेच आहोंत.

**गफूर :** ( रागानें ) लीगी मुसलमान !

**चचा** : मला निष्कारणं वाद घालायचा नाहीं. तूं तुझा हट्ट सोडणार नाहींस. नी मी माझ्या मतापासून तिळमात्र ढळणार नाहीं.

**गफूर** : माझंही तेंच म्हणणं आहे. बरं जशी तुझी इच्छा. जाऊं दे. ती चिमखडी रोषन कुठें गेली ? तिच्यासाठीं साडी आणलीय मी.

**रोषन** : ही काय मी तुमच्या पाठीशीं उभी आहें. पण तुमच्या पाठीला डोळे नसल्यामुळें मी दिसूं शकलें नाहीं तुम्हाला.

**गफूर** : फजूल लडकी. [ साडी तिला देतो ] आवडली कीं नाहीं ?

**रोषन** : पण गफूरचचा ही साडी कुठली. मेड इन हिंदुस्थान कीं पाकिस्तान ?

**गफूर** : अंहं. मेड इन फिल्मीस्तान. [ गफूर हंसतो ] मिर्झा ही पोरगी फार वात्रट होत चालली. हिची लवकर शादी करून टाक. त्याशिवाय नाहीं ही सरळ व्हायची.

**चचा** : अरे हीची शादी ठरवूनसुद्धां टाकलीय मी अन्वरशीं.

**रोषन** : हें हो काय चचा ? ( जावूं लागते )

**चचा** : लागली पळायला.

**रोषन** : पळत नाहीं मी, कॉफी आणायला जातें.

**गफूर** : यावेळीं कॉफी ?

**रोषन** : चचाजानची संवय आहे. जेवणाच्या आधीं यांना कॉफी लागते तुम्हींही घ्या थोडी.

**गफूर** : अच्छा घेऊन ये. [ रोषन आंत जाते. अन्वर आपल्या खोलींतून येतो.]

**अन्वर** : अरे वा मजलीस अगदीं रंगांत आली आहे. चचा मलाही एकदां यायचं आहे तुमच्या पाकिस्तानला सहज ट्रीप म्हणून.

**गफूर** : ये न. केव्हांहि ये. तुझी अशी बडदास्त राहील म्हणतोस कीं, इथं परत यायचा विचारसुद्धां तुझ्या मनांत यायचा नाहीं. अरे पण तूं उभा कां ? बस ना.

**रोषन** : [ कॉफी घेऊन येत ] तो उभा आहे तेंच ठीक आहे. बसला तर लक्षांत सुद्धां यायचा नाहीं कुणाच्या.

**अन्वर** : रोषन हा करारभंग होतोय.

**रोषन** : माफ कर. माझ्या लक्षांत नाहीं राह्यत.

**गफूर** : कसला करार ?

**अन्वर** : तें—तुम्हांला नाहीं कळायचं.

**चचा** : म्हणजे आमच्या नकळत तुझी करार बिरार करून मोकळे झालांत कीं काय ? आजकालचीं मुलं मोठीं हुषार. आपणच आपलीं कामं उरकतात नी आम्हा म्हाताऱ्यांचा बोजा हलका करतात. [ नझीर येतो ] आंत एकटाच काय करीत होतास ?

**नझीर** : वर्तमानपत्र वाचीत होतों.

**चचा** : काय नवीन बातमी. पंजाबची दंगल काय म्हणतेय ?

**नझीर** : दिवसेंदिवस भडकतेय. या धर्मवेड्या लोकांचीं पाशवी कृत्यं वाचून देखील अंगावर कांटा उभा राहातो.

**चचा** : माणूसकीचं विडंबन तें. माणूस किती अधोगतीला जातो याचं हे प्रत्यंतर. नुकतंच कुठं स्वातंत्र्य मिळालं आपल्याला तो हा वणवा पेटला. मला वाटतं तिरंगी झेंड्यांतला लाल रंग कमी फिका वाटला पाकीस्तानी प्रचारकांना म्हणून त्यानी हा रक्ताचा सागर वाहवला.

**नझीर** : पण मुंबईचं वातावरण अजून शांत आहे.

**चचा** : याला कारण मुंबईचं गृहखातं. खरं सांगायचं म्हणजे सामान्य जनतेला युद्ध, दंगल नको असते. शांतता हवी असते. पण आपलं आसन कायम करण्याकरतां एकादा पुढारी आपल्या जमातीचं मनं भडकवतो नी क्षुल्लक ठिणगी पडतांच त्याला वणव्याचं रूप प्राप्त होतं. आज पंजाबमध्यें जे लोक एकमेकांचे हिरहीरीनें प्राण घेत आहेत त्यांचं काय आपआपसांत वैर आहे ? नाहीं. वर्षानुवर्षें ते एकमेकांचे शेजारी म्हणून रहात आले आहेत. त्यांचीं सुखदुःखं एक आहेत. पण धर्माचा पुकारा करुन जेव्हां त्याना डिवचण्यांत येतं तेव्हां त्यांच्यातला सैतान जागृत होतो नी मग शेजार धर्म, माणूसकी, स्नेह या साऱ्यांची होळी होते.

**नझीर** : नी राष्ट्राची इभ्रत धोक्यांत येते. छे छे छे आज जगांत हिंदची केव्हढी नाचक्की होत असेल. चर्चीलचा पक्ष तर उर बडवून सांगत असेल कीं पहा ब्रिटीश निघाल्यावर कसे हे हिंदुमुसलमान एकमेकांच्या उरावर बसले.

**रोषन :** पुरे ही राजकारणाची चर्चा. जगांत दुसरे विषय आहेत कीं नाहींत. मसाल्याचं पुडींग कसं बनवावं ? फोडणीची बिर्याणी कशी करावी ? नी आमलेट कसं करावं ?

**अन्वर :** तें कसं खावं ? नी तुझ्या जिभेला लगाम कसा घालावा ?

**रोषन :** बुटकेपणावर कसं नाचावं ?

**नझीर :** आले पुन्हां दोघे मूळपदावर. चचा या दोघांची लवकर शादी करून टाका. म्हणजे यांचीं भांडणं थंडावतील.

**रोषन :** पण शादीनंतर तरी भांडण थंडावतील याचा काय नेम ?

**नझीर :** थंडावलीच पाहिजेत. माझा सिद्धांतच आहे असा. लग्नापूर्वी एक-मेकाशीं भांडणारी मियाबीबी लग्नानंतर एकजुटीनें शेजाऱ्याशीं भाडूं लागतात.

**गफूर :** मला मात्र शादीला बोलावयाला विसरूं नका. (उठत) ताज, वर चल पाहूं. सामानाची अवराआंवर करूं.

**नझीर :** मी नी अन्वर येतों. ताजला बसूं दे. चचाजवळ उद्यां जाणार ना ती इथून.

**गफूर :** ( हंसत ) बरं बरं. मी एकटाच बांधीन. उगीच तुम्हांला त्रास नको.

**नझीर :** त्रास कसला त्यांत ? [ तिघेही वर जातात. ]

**चचा :** बेटी ताज. कसला विचार करीत बसली आहेस. बोलण्याच्या सुद्धां मनस्थितींत नाहींस तूं.

**ताज :** तुम्हाला सोडून जायची कल्पनासुद्धां सहन होत नाहीं.

**चचा :** मला तरीं कुठें होतेय ?

**ताज :** तुम्ही अब्बाचं मन वळवा. माझ्यासाठीं ! तुमचें म्हणणं ते धुड-कायचे नाहींत.

**चचा :** प्रयत्न करून पाहातों. पण माझं ऐक. अल्लावर पूर्ण विश्वास ठेव. तो करतो तें चांगल्याचकरतां करीत असतो. तोच तुझी काळजी दूर करील.

[ चचा वर जातात ]

**ताज :** [ स्वतःशींच ] दिलवर अजून तुला मला भेटावसं वाटत नाहीं. वेड्या मी उद्यां गेल्यावर तूं इथें आलास तर कांहीं उपयोग होणार नाहीं. [ गाते ]

तुटले कारे धागे सखया तव हृदयीं गुंतले
प्रीतीचे अन् क्षण मधुरतर या पुढति संपले,
संपले, संपले, साजणा ॥

**मागून स्वर कानीं येतात**
वेचुन कणकण मधुर प्रीतीचे स्वप्न गडे सजविले
तुझ्या नकारे परंतु सारे मातीमोल जाहले
श्यामले, प्रेमले, मंगले ॥

**ताज :**
वक्षावरती हात ठेवुनी सत्य तुला सांगते
दोष न माझा परी समाजे पदोपदीं रोखीले
रोखीले, रोखीले, साजणा ॥

**मागून स्वर कानीं येतात**
आठवते कां आणभाक ती एकांतांतील सखे
विलग होऊनी कायमची कां काय गडे साधिले
श्यामले, प्रेमले, मंगले ॥

**ताज :**
ओठावर फिर्याद थांबली अन् आंसू थबकलें
कधीं कुणाला कळायचें ना मन माझें भंगलें
भंगले, भंगले, साजणा ॥

**मागून स्वर कानीं येतात**
दिसतील कां गे तुला आसवें मूक मनीं जाहली
तव नामाचे घोष परन्तू मम हृदयीं चालले
श्यामले, प्रेमले, मंगले ॥

**ताज :**
अजुनि वहाते काळजांतली जखम राजसा तरी
ओघ दडवुनी परी परांच्या संसारी रंगले,
रंगले, रंगले, साजणा ॥

**मागून स्वर कानीं येतात**
तुझ्याविना मम उजाड झाली जीवन वटिका तरी
बाग सुखाचा तव वाटेवर मोहरुदे प्रेमले ॥
श्यामले, प्रेमले, मंगले ॥

( गाणं संपतां संपतां दिलवर दरवाजांत येऊन ' ताज ' म्हणून हांक मारतो )

**ताज** : दिल ! तूं अगदीं निष्ठूर आहेस दिल.

**दिलवर** : माझा इलाज नव्हता. तुला भेटावसं रोज मनांत येई पण—

**ताज** : तूं गेल्यापासून माझी काय स्थिति झाली याची कल्पना तरी आहे का तुला ?

**दिलवर** : आहे ताज. पण काय करणार. परिस्थितीच्या धर्मभावनेच्या बंधनांनीं आपण जखडले गेले आहोंत.

**ताज** : आपण तोडूं या हें बंधन.

**दिलवर** : ताज. तुला वाटत इतकं हें सोपं नाहीं. मी गेले चार दिवस विचार करतोंय पण कांहींच निर्णय लागेना, म्हणून एकवार तुझं शेवटचं दर्शन घेण्यासाठीं येथवर आलों.

**ताज** : दिल मला आतां पाकीस्तानांत जावं लागणार आहे. मला इथून घेवून जा कुठेंही. तुझ्या ताजला एकटी टाकून जावूं नकोस. जगायचं तर एकत्र जगूं नी मरायचं तर एकत्र मरूं.

**दिलवर** : खरं आहे तुझं म्हणणं. पण हें कसं शक्य आहे ?

**नझीर** : [ प्र. क. ] शक्य आहे. दिलवर तूं हीला आतांच्या आतां घेवून जा. मी करतों सारी व्यवस्था टॅक्सी घेवून येतों मी. मग खुदा तुमचं रक्षण करो

[ बाहेर जातो ]

**ताज** : देवदूत आहे नाहीं आपला नझीर.

**दिलवर** : देवदूत सुद्धां इतके चांगले नसतात.

**ताज** : आपले लोक उगाच मक्कामदीनाला जातात. नझीरचं दर्शन घेतलं कीं सारीं पुण्य जोडतां येतील.

**दिलवर** : ताज चचाना आपण पळून गेल्याचं कळलं तर काय होईल.

**ताज** : अब्बा कराचीला गेल्यावर भेटूं आपण चचाना. [ गफूर जिन्यावर येतो व पुन्हा जावून काठी आणतो ]

**दिलवर** : आपण कुठें जायचं. काय करायचं. कांहींच ठरलेलं नाहीं. [ बाहेरून मोटारचा हॉर्न ऐकूं येतो तशी ताज पुढें व दिलवर मागें असे दरवाजाकडे जातात. मागोमाग गफूरही येतो. व दिलवरच्या डोक्यावर प्रहार करतो.

दिलवर किंचाळी मारून पडतो. अन्वर माडीवरून येऊन बाहेर जातो व नझीरच्या मदतीनें दिलवरला आंत आणून कोचवर ठेवतो. ]

**चचा :** ( माडीवरून येत ) काय झालं? कोण दिलवर? कोणी केलं हें नीच कृत्य ? ( रोषन बाहेर येते )

**गफूर :** मी केलं हें.

**चचा :** तूं ? तूं असं करायला नको होतंस. फार वाईट केलंस तूं हें. पण मी हें सहन करणार नाहीं. अन्वर डॉक्टरला बोलव. रोषन गफूरचं सामान आण.

**गफूर :** कशाला ?

**चचा :** तुला एक क्षणभर देखील या घरांत राहूं द्यायची माझी इच्छा नाहीं. मी आतांपर्यंत मनोमय एका शब्दानें देखील दुखवलं नव्हतं पण आज तूं माझा अंत पाहीलास. जा चालता हो माझ्या नजरेसमोरून. ( रोषननें आणलेले सामान गफूर घेतो )

**गफूर :** अच्छा. याचा तुला पश्चात्ताप होईल. चल ताज.

**ताज :** चचा.

**चचा :** बेटी. [ जवळ जातो. ]

**गफूर :** [ तिला खेंचत ] खबरदार तिला स्पर्श करशील तर. माझी बेटी आहे ती. [ रोषन गफूरचं सामान आणते. गफूर ताजला ओढीत बाहेर जातो. ]

**पडदा**

# ४

[ स्थळ—मागील अंकांतील. काळ सुमारें महिन्यानंतर. वेळ संध्याकाळ पांचची. पडदा उघडतो त्यावेळीं चचा आराम खूर्चीवर बसून हुक्का पीत आहेत. नझीर वर्तमानपत्र वाचीत आहे. रोषन गाणं गुणगुणत आहे. ]

**चचा :** बंद कर तें गाणें.

**रोषन :** [ चचाच्या खांद्यावर हात ठेवीत ] चचा आजकाल झालंय काय तुम्हाला ? पूर्वीसारखं आमच्याशीं हंसत बोलत नाही. कशांतच मन लागत नाहीं तुमचं.

**चचा :** बेटी कसं लागणार मन ? कांहीं करूं लागली कीं मागचे सारे प्रसंग मनांत गर्दी करतात नी मन उदास होतं. ताज कराचीला गेली तिच्याकडून पत्र नाहीं. दिलवरचं हें असं.

**नझीर :** दिलवर आतां बरा झालाय. आज उद्यांकडे फिरूं लागेल.

**चचा :** त्याबद्दल म्हणत नाहीं मी. त्याच्या डोक्यावर गफूरनें केलेल्या प्रहरामुळें त्याची पूर्वीची स्मृती जाग्यावर आलीय. तो आपल्याला कुणालाच ओळखूं शकत नाहीं.

**नझीर :** त्याला आपला काय इलाज ?

**रोषन :** ताज इथें असती तर. किती बरं झालं असतं !

**चचा :** यापुढें ती इथें यायची नाहीं. गफूर पक्का दुराग्रही आहे. तो तिला कधींच इथं पाठवायचा नाहीं. बेटी अन्वर कुठें गेलाय ?

**रोषन :** तो बसलाय दिलवरच्या खोलींत. ( दिलवरच्या खोलींतून दिलवरचा अन् अन्वरचा आवाज ऐकूं येतो. खोलींतून पहिल्यानें अन्वर व मागाहून दिलवर येतो. ) [ रोषन गॅलरींत जाते ]

**दिलवर :** मला कळत नाहीं तुम्ही लोकांनीं माझा पिच्छा कां करावा ?

**अन्वर :** पण दिलवर.

**दिलवर :** लाखवेळां सांगितलं कीं माझं नांव मोहन आहे. दिलवर नांव तुम्हां मुसलमानांत असतं. मीं हिंदू आहें.

**नझीर :** कबूल आम्हाला. पण मोहन तूं एव्हढ्यांत फिरायला कां सुरवात केलीस ? डॉक्टरनीं तुला आणखी दोन दिवस उठूं नको म्हणून सांगितलं होतं.

**दिलवर :** डॉक्टर. तोही तुमचा जातभाई. माझ्या प्रकृतीची काळजी घ्यायला मी समर्थ आहें. समजलांत. [ एकदम ] पण मी इथें कुठें आलों ? नौखालीला हिंदूंचं हत्याकांड सुरू झालं होतं. आई-बाबा सर्वांची घरासह आहुती पडली त्यांत. मी आणि जगदीश कसे-बसे निसटलों आणि मुंबईला निर्वासीत कँपांत आलों. पण एके रात्रीं. हो, रात्रच होती. आम्ही रोषणाई बघायला निघालों. जगदीशची नी माझी चुकामूक झाली. मी त्याला वेड्यासारखा शोधूं लागलों. तोंच एक मोटर समोरून आली. आणि मी मी. [ तोंड झांकून घेतो. ]

**चचा :** बेटा, असा त्रागा करून काय होणार आहे ?

**दिलवर :** बेटा ? कोण बेटा ? मी ? मला बेटा म्हणणारी एक व्यक्ती ह्या जगांत होती. तिचा तुम्ही लोकांनीं बळी घेतलात. मला अनाथ केलंत नी वर मानभावीपणा दाखवतां. ( एकदम ) जगदीश ! तुम्ही सारे कोण आहांत ?

**चचा :** तुझे हितचिंतक.

**दिलवर :** ( हंसत ) हितचिंतक. लांडगा म्हणे कोंकरांचा हितचिंतक. ( मोठ्यानें हंसतो. )

**चचा :** बेटा, अजून तूं पूर्ण बरा झाला नाहींस. ( त्याच्या जवळ जात ) जा विश्रांती घे.

**दिलवर** : दूर व्हा. मायेनं एक हात गळ्याभोंवतीं टाकून दुसऱ्या हातानें सफाईदार गळा कापणारी जात आहे तुमची. तुम्ही इथें कां आलांत? काय संबंध तुमचा माझा?

**नझीर** : मोहन. नौखालींतून जेव्हां तूं इथें आलास नी तुला मोटर अपघात झाला. त्या मोटरच्या मालकांचें हें घर. ( चचा अन्वर चमकून पाहातात. नझीर खूण करतो. ) त्याच्यावर तूं फिर्याद करूं नये म्हणून या घराची वरची माडी त्यानें आम्हाकडून घेऊन तुला दिली. मध्यंतरी तूं आजारी पडलास नी तुझी सुश्रुषा करण्यास आम्ही तुला या हवेशीर खोलींत आणून ठेवला.

**दिलवर** : मग जगदीश कुठें आहे. मला जाऊन भेटायला हवं त्याला कँपमध्यें.

**नझीर** : तो इथें नाहीं. त्याला नागपूरला नोकरी मिळाली म्हणून तो गेला.

**दिलवर** : तुम्ही काय म्हणतां याचा अजून मला उमज पडत नाहीं. मोटार अपघात. मोटारवाला. ही माडी, नागपूर, छे छे! डोक्यांत असंबद्ध विचाराचं थैमान सुरूं झालंय. हें सारं स्वप्न तर नसेल. नाहीं. मग हें असं कसं झालं? मला शांतपणें विचार करायला हवा.

**चचा** : त्या खोलींत जाऊन विश्रांति घे.

**दिलवर** : नको माझी माडी असतांना तुमच्या खोलींत विश्रांती घ्यायची जरूर नाहीं मला. [ जाऊं लागतो. ] नी हें पहा परत परत त्रास द्यायला कुणी येऊं नका. तुमच्या लोचटपणामुळें वैतागून गेलोंय मी. माझ्या प्रकृतीचा पुळका तुमच्या हुक्क्यांत ठेवून द्या. [ माडीवर निघून जातो. ]

**नझीर** : पाहीलंत चचा.

**चचा** : त्यांत त्याचा दोष नाहीं. तो सारं सारं विसरून गेला आहे. त्याचं सारं कुटुंब नौखालीच्या दंगलींत आपल्या लोकांच्या हातून मारलं गेलं. हें कसं विसरूं शकेल तो?

**अन्वर** : पण नझीर भय्या ही माडी त्याला मोटारवाल्यानं नावावर करून दिली ही थाप कां मारलीस?

**नझीर** : नाहींतर तो मघाशींच या घरांतून निघून गेला असता. एका मुसलमान कुटुंबांत तो आश्रीत म्हणून राहीला असता कां?

**चचा** : तूं वागलास तेंच बरोबर आहे. सध्या त्याला एकटा बाहेर सोडणं धोक्याचं आहे. जगदीशही नाहीं इथें. संतापाच्या नी उद्वेगाच्या भरांत तो जीवाचं कांहीं तरी करून बसेल.

**अन्वर** : पण यावर कांहींच उपाय नाहीं कां ?

**नझीर** : आहे. पण तो अमलांत आणणं अशक्य आहे. कसला तरी जबरदस्त धक्का त्याच्या मेंदूला बसायला हवा.

**चचा** : मला वाटतं ताज इथं आली तर त्याच्या मेंदूवरलं हें विस्मृतीचं पटल दूर होऊं शकेल.

**नझीर** : मला नाहीं वाटतं तसं. या मूढावस्थेंत तो कुणालाच ओळखूं शकणार नाहीं. यावेळीं ताज इथं नाहीं हेंच बरं.

**चचा** : तिनें हें पाहीलं तर केव्हढा धक्का बसेल तिच्या मनाला. अरे पण रोषन कुठें गेली ?

**अन्वर** : ती गॅलरींत आहे. रोषन ( रोषन येते. )

**चचा** : तूं ऐकलं सारं.

**रोषन** : होय. ताजला कळवूं या हें सारं ?

**चचा** : पगली. तिच्या दुःखांत भर कां टाकायची आहे आपल्याला ? आधींच तिनें हाय घेतली असेल. नको. असं कांहीं करूं नकोस. गफूर या घरांत यायच्यापूर्वी हें घर कसं गजबजलेलं, हसण्या-खिदळण्यानं भरलेलं होतं. तुम्हा बच्चे लोकांची ती मधूर किलबील सारं संपलं आतां. आतां कुणाच्याही चेहऱ्यावर आनंद दिसत नाहीं. कुणीही मनमोकळेपणीं बोलत नाहीं.

**नझीर** : कसं बोलवेल कुणाला ? ह्या भयाण परिस्थितींत आपण सारेच कमी अधिक गुंतलेले आहोंत. [ बाहेर गडबड ऐकूं येते ]

**चचा** : काय झालं रे ?

**अन्वर** : [ गॅलरींतून पहात ] लोक थव्या-थव्यानें जमून कांहींतरीं वाचताहेत. [ अन्वर बाहेर जातो व एक पत्रक घेवून येतो. ]

**चचा** : काय आहे रे ?

**अन्वर** : घात झाला अब्बा. आकाश कोसळलं.

**चचा** : म्हणजे !

**अन्वर** : गांधीजींचा खून झाला.

**नझीर** : गांधीजींचा खून झाला. नाहीं नाहीं, कांहींतरी चूक झाली असेल.

**चचा** : असं होणं शक्य नाहीं. कसं होईल असं.

**अन्वर** : हें असं नसावं अशी प्रत्येकाची इच्छा होती. पण हें पत्रक पाहा.

**नझीर** : [ वाचीत ] कोण हा चांडाळ असावा ? महात्माजीसारख्या जगवंद्य विभूतीवर चालवायला त्याचा हात तरी कसा धजला. हें कसं झालं चचा ?

**चचा** : [ त्याला थोपटीत ] नझीर.

**नझीर** : माझ्यावर केव्हढा जीव होता त्यांचा. नौखालीच्या सैतानी मुलखांत त्यांच्या मायेच्या बरसातीमुळेंच तें जीणं सुसह्य झालं होतं. नाहीं हें असं व्हायला नको होतं.

**चचा** : जगांतील कुठलीही वाईट गोष्ट व्हायला नको होती.

**नझीर** : चचा ! चचा !

**रोषन** : भय्या, भय्या, असं काय पाहातोस वेड्यासारखं ?

**नझीर** : चचा मी खुदाचा काय गुन्हा केला होता म्हणून त्यानें मला असली जालीम शिक्षा दिली.

**रोषन** : चचा. आज खरोखरच चाळीस कोटी लेंकरें अनाथ झालीं. दलीतांची दयेची पाखर, सज्जनांचा सहारा आज नाहींसा झाला.

**नझीर** : एव्हढा मोठा घांस मिळाल्याबद्दल मृत्यूदेखील खदखदां हंसत असेल नाहीं चचा ? मृत्यूच काय पण सारी दुनिया हिंदवासीयांकडे बोट दाखवून हंसत असेल. ब्रिटिशांना जें शक्य झालं नाहीं तें एका आपल्याच बांधवानं करावं. त्याला गोळया चालवायच्या होत्या तर आम्ही आमच्या छातीचे कोट पुढें केले असते.

**रोषन** : भय्या, ह्या निष्ठूर बातमीनं साऱ्या भारताला दुःख झालं आहे. सारं चराचर आज दुःखग्रस्त आहे.

**नझीर** : पण माझं दुःख ! मी त्यांचा निकटचा सहकारी होतों मला गेलं पाहिजे चचा. मला गेलंच पाहिजे.

**चचा** : कुठं जाणार आहेस तूं ?

**नझीर** : दिल्लीला. त्यांचं अंत्य दर्शन तरी घ्यायला मला गेलं पाहिजे.

**चचा :** खुशाल जा. आम्ही तुला रोखणार नाहीं. तिथं गेल्यानंतर माझ्या वतीनं महात्माजीना एक सलाम कर नी त्यांच्या आत्म्याला सांग कीं तुमच्या निर्वाणामुळें एक बुड्ढं दिल कायमचं बेचैन झालं आहे. ( नझीर उठतो. )

**अन्वर :** आत्तांच चाललास ?

**नझीर :** होय.

**रोशन :** थांब मी तुझी कपड्याची ब्याग आणतें.

**नझीर :** वेडी. मी समारंभाला कां जात आहे ? मला कांहीं नको. फक्त तेथें पोचून दर्शन घेईपर्यंत माझ्या जीवांत जीव राहावा अशी खुदाची प्रार्थना कर. अच्छा चचा. अन्वर, रोषन, दिलवरला सलाम सांगा. [ निघून जातो ]

**चचा :** पगली रडतेस. पूस ते डोळे. पाहा मी कुठें रडतोंय. जिवाचा आकांत करून रडावं असं वाटतंय मला. पण अश्रू ओघळायलाच कबूल नाहींत. बेटी बापूंजीचं तें आवडतं भजन म्हण पाहू. [ रोषन भजन म्हणते—

रघुपतिराघव राजाराम । पतित पावन सीताराम ।

ईश्वर अल्ला तेरे नाम । सबको सन्मति दे भगवान ।

भजन संपतां, " रघुपति राघव राजाराम " हा चरण पुटपुटत चचा आंतल्या खोलीत जातात ]

**अन्वर :** रोषन चल आपण चचाबरोबर जावूं या. मला चचा बद्दल भीति वाटते. फार मनाला लागलंय त्यांच्या.

**रोषन :** चल. [ दोघंही त्या खोलींत जातात. क्षणभर कुणीही नसतं तोंच ताज प्रवेश करते. तिच्यात बदल झाला आहे. अंगावरचे कपडे मलीन झाले आहेत. केंस अस्ताव्यस्त झाले आहेत. डोळ्या भोंवतीं कंगोरे पडले आहेत. दिवानखान्यांत येऊन ती क्षणभर थबकते. एकदा सारा दिवाणखाना न्याहाळते. दिलवरच्या खोलींत जावून कानोसा घेते. व परत दिवाणखान्यांत येते तोंच जिन्यावर पावलें वाजतात. दिलवर खालीं येतो. त्याच्या चेहऱ्यावरून तो कुठें तरी बाहेर जाणार असावा असं वाटतं. त्याला पाहिल्याबरोबर ताज भावना वेगानें पुढें जातें. ]

**ताज :** दिलवर.

**दिलवर** : [ मागें सरकत ] कोण तूं ? नी एकदम अंगावर काय पडतेस ? गळ्यांत पडायची नवी तऱ्हा भिकारणींनी शोधून काढली वाटतं.

**ताज** : भिकारीण. दिल चेष्टेलासुद्धां सुमार असतो.

**दिलवर** : माझं नांव दिल नाहीं. माझं नांव मोहन आहे.

**ताज** : नाहीं नाहीं. तुझं नांव दिल आहे मी ठेवलं आहे ते ! मला माहीत आहे हें सारं नाटक तूं कां करीत आहेस ? तुला तशा जखमी स्थितींत टाकून गेलें म्हणून तूं रागवलास आहेस. पण माझा काय इलाज होता ? अब्बानी मला बळजबरीनं नेलं. रडत रडत मी कराचीला पाऊल टाकलं. मला कांहीं सुचत नव्हतं. सारखी तुझी मूर्ती डोळ्यासमोर यायची. तुझी तब्येत कशी असेल ही एकच काळजी भेडसावीत होती मला.

**दिलवर** : काय भारुड चालवलंस तूं ?

**ताज** : माझ्या बदनशीबाची कहाणी तुला भारुड वाटते अं. इतका रागावलास तूं माझ्यावर ?

**दिलवर** : तुझ्यावर रागावण्याचा माझा काय संबंध ? तूं कोण कोठली ?

**ताज** : दिल माझी ओळख विसरलास एव्हढ्यांत ? वेड्या तुझ्या ताजला तूं विसरलास ? या कोचावर तासाचे तास गप्पा मारीत आपण बसत होतों. त्या गॅलरींत आपण प्रितीच्या गुजगोष्टी करीत होतों. नी याच गॅलरींत ' मी तुझा आहे ' अशी ग्वाही तूं मला जवळ घेवून दिली होतीस.

**दिलवर** : वेड बिडतर लागलं नाहीं ना तुला ? यापूर्वी कधीं पाहीली नाहीं नी म्हणे मी तुला ग्वाही दिली.

**ताज** : असं कां बरं वेड पांघरतोस ?

**दिलवर** : तुलाच 'वेड लागलंय. तुझं डोकं तपासून घेऊन ये. वेड्याच्या हॉस्पीटलांतून पाहारेकऱ्याच्या हातावर तुरी देवून पळून तर नाही ना आलीस ? कीं वेडाचं सोंग घेवून नवजवानांना आपल्या मायजाळ्यांत गुंनवणाऱ्या बाजार बसव्यापैकीं—

**ताज** : दिल, हें तुझ्या तोंडून ऐकण्यासाठींच मी इथें आलें ? कोसाचं अंतर पायीं तुडवींत मी आलें. साऱ्यासुखावर तिलांजली सोडून एकाद्या भिकारणी-सारखी तुझ्यापाशी भीक मागायला आलें म्हणून नी भिकारीण ठरलें. एका

मंत्र्याची बेटी असून देखील तुझ्यावर मोहब्बत केली म्हणून मी वेडी ठरलें ? नी नझीरसारख्या देवमाणसाला दूर सारून तुझ्या पायाशीं आलें म्हणून मी बाजारबसवी ठरलें ? [ तोंड झांकून रडते ]

**दिलवर** : हें नाटक पुरें झालं. ह्या तुझ्या नाटकानं फसण्यासारखे अजागळ या घरांत पुष्कळ आहेत.

**ताज** : बोल थांबलास कां ? तुझ्या विषारी शब्दांनीं रक्तबंबाळ होऊं दे माझं हृदय. असं अर्धवट तडफडत कां ठेवलंस त्याला. खरी मोहब्बत इतकी जालीम असते अं ? दिलवर मला वाटलं होतं कीं नकाशाचा रंग बदलेल, ऋतु बदल-तील, जमाना बदलेल पण तूं बदलणार नाहींस. अखेर तूं पुरुषाच्या जातीवर गेलास. पाहा जरा निरखून पाहा तुझ्या ताजकडे ! पाहीलीस तिची दैनावस्था ! एका मंत्र्याची मुलगी. सारी सुख पुढ्यांत हात जोडून उभी असतां अशी लाचार होऊन तुझ्या दाराशीं कां आली ? साऱ्या जमातीकडून सुटणारे निंदेचे बाण वक्षावर झेलीत तुझ्या दारीं कां आली ही भिकारीण ? हे डोळ्या भोंवतीचे कंगोरे पाहा. हें आंत ओढलेले गाल पहा. तुझ्यावरील आत्यंतिक मोहब्बतींची ही लक्षणं आहेत.

**दिलवर** : कां उगीच तोंडाची वाफ डवडतेस ? खरोखरीच तुला कोणी फसवलेलं असेल तर त्याला आपण शोधून काढूं. नी चांगली शिक्षा करूं.

**ताज** : त्याला शोधून काढायला नको. तो माझ्या समोर उभा आहे.

**दिलवर** : आतां मात्र हद्द झाली ! तुला खरोखरच वेड लागलेलं दिसतंय. खुशाल बडबड. मीच बाहेर जातों. [ बाहेर निघून जातो. तो गेलेल्या दिशेकडे पाहात ताज गाणं म्हणते. ]

अश्रूनो फिरा जरा मागें
व्हायचें तें झालें मागें
कशास आतां ओघळायचे
पापणीवरी स्थिरावयाचे
जेथल्या तेथें करपायचें
हें नशीबी लागे ॥

तिथेंच तुमची हद्द संपली
जिथें प्रीतीचीं थडगी रचलीं
आकांक्षांची स्वप्नें विरली
अन् तुटले धागे ॥
प्रीतिचें नव विश्व उभवलें
होऊनिया बेहोष रंगलें
हाय परीतें स्वप्न भंगलें
घाव जीवा लागे ॥

[ गीत संपल्यानंतर रोषन खोलींतून बाहेर येत. ]

**रोषन :** कोण ताज ? [ तिला मिठी मारते. ]

**ताज :** रोषन !

**रोषन :** तूं अन् यावेळीं ? या स्थितींत ?

**ताज :** रोषन, रोषन.

**रोषन :** काय ही तुझी दशा. [ एकदम ] पळून आलीस तूं ?

**ताज :** होय.

**रोषन :** नी गफूरचचांना कळलं तर ?

**ताज :** तर होइल काय व्हायचं तें. मेलेलं कोंबडं आगीला भीत नसतं. ज्याच्यासाठीं मी पळून आलें तो जिवाचा साथीदार जर ओळख द्यायला कबूल नाहीं तर असलं निष्प्रेम जिणं—

**रोषन :** दिलवर बद्दल म्हणतेस तूं ?

**ताज :** होय रोषन. तो मघाशीं मला काय काय बोलला हें तूं ऐकलं असतंस तर एक क्षणभर देखील जिवन्त राहिली नसतीस. रोषन, त्यानें मला भिकारीण, वेडी, बाजारबसवी ठरवलं. ( रडूं लागते )

**रोषन :** ह्य दिलवरचा दोष नाहीं.

**ताज :** मग कुणाचा, माझा ? माझ्या एकनिष्ठ प्रेमाचा ?

**रोषन :** ऐकून घे वेडे. गफूरचचांनीं दिलवरच्या मस्तकावर केलेला प्रहार तुला आठवतो कां ?

**ताज :** तो प्रसंग कसा विसरेन मी !

**रोषन :** त्या प्रहारामुळें त्याच्या मेंदूला जबरदस्त धक्का बसला नी त्याची पूर्व-स्मृति जागृत झाली. आपण हिंदू आहोंत नी आपलं सारं कुटुंब नौखालींत मुसलमानाकडून मारलं गेलं हें त्याला आठवूं लागलं. तो खरा हिंदू आहे नी त्याचं नांव मोहन आहे.

**ताज :** खरं सांगतेस तूं हें ?

**रोषन :** अगदीं खरं.

**ताज :** बिचारा दिलवर. रोषन माझ्या प्रेमाच्या सामर्थ्यावर मी त्याला ओळखायला लावीन.

**रोषन :** थांब चचांना अन् अन्वरला सांगून येतें तूं आल्याचं. पण ताज चचांना संशय येतां नये तुझ्या ह्या स्थितीचा. तूं पळून आलीस हें हीं सांगू नकोस हं त्यांना [ रोषन दारांतून हांक मारते. ] चचाजान अन्वर बाहेर या.

[ अन्वर व चचा प्र. क. ]

**अन्वर :** ताज.

**चचा :** बेटी ताज, [ तिला जवळ घेतो. ] केव्हां आलीस ?

**ताज :** आत्तांच

**चचा :** एकटीच आलीस ?

**ताज :** होय.

**चचा :** गफूर नाहीं वाटतं बरोबर आला ?

**ताज :** नाहीं.

**चचा :** गफूर तुला जेवायला वाढत नव्हता वाटतं भरपूर ?

**ताज :** म्हणजे चचा ?

**चचा :** अशी दशा कां झाली तुझी. पुढल्यावर्षी डॉक्टरीण होणार तूं. प्रकृतीची काळजी घ्यायला आम्ही काय शिकवणार तुला ! किती दिवसाच्या रजेवर पाठवलंय गफूरनं तुला ?

**ताज :** कायमची.

**चचा :** म्हणजे ?

**ताज :** अब्बांनीं पाठविलं नाहीं मला. मी पळून आलें.

**चचा :** पळून आलीस ताज, फार वाईट गोष्ट केलीस तूं. तूं असं वागायला नको होतंस.

**ताज :** पण माझं तिकडे मन लागेना. माझी सारी दौलत इथें असतांना मी तिथें कशी राहाणार ?

**चचा :** तें सारं खरं आहे. पण गफूरला काय वाटेल ? त्याच्या अब्रूवर घाव घातलास तूं. ही गोष्ट तिकडे कळली तर तोंड दाखवायला जागा राहाणार नाहीं गफूरला.

**ताज :** पण मी. मी पाहयलं आहे. जग नेहमीं मोठ्यांच्या भावनांची कदर करीत असतं. पण आम्हा तरुणांची ! आम्हांलाही भावना असतात. मुलगी झाली म्हणजे दावणीला बांधून न्यायची गाय समजतां तुम्ही मोठी माणसं. आमच्या आकांक्षांचा चक्काचूर झाला तरी चालेल, आमच्या मोहब्बतीचं थडगं रचावं लागलं तरी चालेल. आम्ही वडिलांच्या बाह्य जगांतील मानासाठीं धडपडलं पाहिजे. हा न्याय तुम्हां लोकांचा ! बरोबर आहे हे नीति नियम. तुम्ही मोठ्या लोकांनीच केले आहेत. तुमचे पक्षपाती असायलाच हवेते.

**चचा :** ताज. ताज.

**ताज :** माफ करा चचा. मीं एव्हढं बोलायला नको होतं. पण काळजांतले कढ अनावर झाले माझ्या. मी तुमच्या पायाशीं आसऱ्यासाठीं आलें आहे. तारणं किंवा मारणं तुमच्या हातीं आहे. राहिलें तर तुमच्या पायाशीं राहीन. नाहींतर तुमच्या पायाशीं डोकं आपटून प्राण देईन.

**चचा :** तुला मी दूर करीन असं वाटलं तरी कसं ? पण बेटी ज्या जगांत आपल्याला राहायचं आहे त्या जगासारखं थोडं फार आपल्याला रहायला हवं. इतकंच माझं म्हणणं.

**ताज :** जग ! कुठलं जग ? मी ओळखत नाहीं हें स्वार्थी जग. माझं जग तुमच्या पायाशीं सामावलेलं आहे. नी हेंच जग फार प्रेमळ, उदार नी मोठं आहे हें मला माहीत आहे. [ डोळ्यांत अश्रु येतात ]

**चचा :** पूस पाहूं ते डोळे. पगली कुठली. दिलवर भेटला काग तुला ? [ अन्वर गॅलरींत जातो. ]

**ताज :** होय मघाशींच.

**चचा :** ओळखलं त्यानं तुला ?

**ताज :** अं हं.

**चचा :** हा त्याचा दोष नाहीं.

**ताज :** रोषननं सारं सांगितलं मला.

**अन्वर :** [ गॅलरींतून येत ] चचा. दिलवर येतोय. [ ताजच्या चेहऱ्यावर निश्चय दिसूं लागतो. ]

**चचा :** दिलवर ! मग ताज काय करणार आहेस तूं.

**ताज :** अखेरचा प्रयत्न. तुम्ही सारे वर जा. परिस्थितीवर विजय मिळविण्याचा अखेरचा प्रयत्न करणार मी.

**चचा :** मुबारक हो. ( माडीवर जातात. जातां जातां रोषन व अन्वरला खूण करतात. अन्वर रोषन वर जातात. )

( दिलवरची चाहूल होते. )

**दिलवर :** ( प्र. क. ) ( जिन्याकडे जाऊं लागतो तोच त्याचं लक्ष ताजकडे जाते ) अरेच्या तूं अजून इथंच ? ही काय धर्मशाळा समजलीस ?

**ताज :** ही धर्मशाळा नव्हे. हें माझं घर आहे. मी मिर्झा चचांची मुलगी आहे. माझं नांव मुमताज. समजलं दिलवर ?

**दिलवर :** तुला एकदां सांगितलं कीं माझं नांव दिलवर नाहीं म्हणून.

**ताज :** तूं तुझं नांव विसरला आहेस. जरा आठवून पहा. तूं इथं आलीस ती अपराधी रात्र आठव. नाहीं आठवत ? मग ज्या दिवशीं तूं शुद्धीवर येऊन डोळे उघडलेस ती रात्र आठव. स्वर्गंगेच्या शुभ्र ओघळांत वहाणारं गुलबकावलीचं फूल दिसलं तुला त्यावेळीं.

**दिलवर :** गुलबकावलीचं फूल ?

**ताज :** मी हंसलें. मिटलेल्या कमळाच्या पाकळ्या उघडल्या ! अजून नाहीं आठवत ?

**दिलवर :** काय चालवलंयस तू हें ? तूं चेटकीण तर नाहींस ना ? माझं डोकं असं गरगरायला कां लागलं ?

**ताज :** कारण मोहब्बत. ती पौर्णिमेची रात्र आठवते तुला ! मी गात होतें [ गाण्याची ओळ म्हणते. तो कावरा बावरा होतो ] तूं आंत आलास. तुला वाटूं लागलं कीं हें गीत कधींच संपू नये. अनादीकालपर्यंत चालूं रहावं. त्या सूर सागराच्या प्रवाहांत—

**दिलवर** : चंचल लहरीच्या नावेंत—

**ताज** : तुला आठवूं लागलं. आठव आणखी—

**दिलवर** : नाहीं. नाहीं. काय बडबडतोय मी हे ! जा. तूं निघून जा इथून.

**ताज** : अजून थोडं आठवण्याचा प्रयत्न कर. त्याकाळ्या रात्रीं तूं या गॅलरींतून वर आलास आपण दोघें पळून जायचं ठरलं. नझीर टॅक्सी आणायला गेला तोंच अब्बा आले. त्यांनी तुझ्या डोक्यावर प्रहार केला. [तो तोंड झाकून घेतो] आठवतं तुला दिलवर ? तुझी ताज तुला विचारते आहे. दिलवर दिलवर.

**दिलवर** : [ कानावर ठेवीत ] गप्प रहा. गप्प रहा.

**ताज** : नाहीं, तुला आठावायलाच हवं. पहा माझ्या नेत्रांत डोकावून पाहा. गेल्या सहा महिन्यांतल्या आपल्या प्रणयाचा सारा इतिहास तुला दिसेल. [जवळ जाते तो तिला "दूर हो" म्हणून ढकलतो ती कोलमडते, तिच्या डोक्याला जखम होते व रक्त वाहूं लागतें. तें रक्त ती त्याच्या तोंडावर शिंपडतें ] पाहा तरी आठवण होतें कां ! चाट तें रक्त. हें रक्त तुझ्या ओठाला लागलेलं तुला आठवत ! आठवून पाहा. दिवाळी जवळ आली होती. म्हणून मी आकाशदिव्यासाठीं काड्या करीत होतें. तूं बाजूला बसला होतास. माझं एकदम बोट कापलं नी त्यांतून रक्त वाहूं लागलं. मी आयोडीन आणण्यासाठीं म्हणून उठलें तोंच तूं मला जवळ घेतलंस. नी तें रक्ताळलेलं बोट ओठांना लावून सार रक्त शोषून घेतलंस. त्या रक्ताची आतां तरी आठवण होते कां ? [ त्याच्या चेहऱ्यावर विकार बदलूं लागतात. ] दिलवर अजून तरी तुझ्या ताजला ओळख. [ दिलवर कावरा बावरा होतो ]

**ताज** : दिलवर, दिलवर, दिलवर—

[ सारं जग त्याच्या डोक्याभोंवतीं फिरूं लागतं, हळूंहळू त्याला आठवूं लागतं नी तो एकदम ओरडतो. ]

**दिलवर** : ताज !

**ताज** : दिल ! [ त्याच्या अंगावर पडते. ]

( पडदा )

**समाप्त**